माझे मित्र

कै. भास्कर रामकृष्ण दामले

वकील, ठाणें

यांचे स्मृतीस

# सुधा

वृत्त साकी

:: १ ::

सुधेसारखी सुधा ! न कथणें अर्थालंकारानें
सकल शिष्यगण गुरुही ऐसें म्हणती आनंदानें

होता नीटस नाजुक बांधा अंग नितळसें गौर
तरल लोचनां चापल्याची जोड मिळाली स्वैर

महान विद्यालयीं येत ती घर अपुलें सोडोनी
छात्र तिच्यापरि कितीक आले कीर्तीला ऐकोनी

कुणी न आले विद्येसाठीं, पदवीसाठीं जमले
पदवीवांचुनि नोकरि मिळणें दुष्कर होउनि गेलें

प्राध्यापकजन पाठां देती माप टाकिती अपुलें
ध्येय परीक्षा, ज्ञानहि जुजबी, तेंही देतां थकले

स्वातंत्र्याचे भोक्ते पालक धना पाठवुनि देती
शिकोत म्हणती मुलें कशींही, बघा कशाला रीती ?

अनुभव येइल तईं उमजतिल, करुं आपण कर्तव्य
मुलें पाहतिल जरी वाटलें केलेलें स्मर्तव्य

कुणि पोटाला चिमटा घेउनि रीण करोनी गांठीं
मुलें धाडिती शिकण्या, म्हणती ही तर अमुची काठी

मुलें निरखिती फुलें कोणतीं येथें फुलुनी आलीं
दंग होउनी भाव पाहती तैशा बोली चाली

वेळेआधीं प्रवेशमार्गीं मोक्याच्या जागेला
गांठायातें छात्रवर्ग हा सारा होय भुकेला

नवीन केले सूट घालुनी प्रदर्शना मांडावें
वाक्सुमनांना हौशि खेळियांकडून उधळुनि घ्यावें

कुणिं केलेल्या गोड सुधामय थट्टेला परिसावें
भलत्यासलत्या स्वप्नतरंगीं चित्ता मग रमवावें

डोळे भरुनी तरुण अवयवां हौसेनें निरखावें
तुलना करुनी वगळुनि वेंचक सौंदर्या निवडावें

जरा दुज्याशीं सलगी दिसतां सूक्ष्म चुरसही वाढे
आणि म्हणति कीं असे खरोखर पोरींचें मन कोडें

ही ‘ के ’ आली कुणीं म्हणावें, कुणी म्हणे, ‘ मार्लीन ’
‘ मर्ना ’ दिसते कुणीं म्हणावें, आहे ‘ डेक्कन क्वीन ’ !

ऐकूं जातिल मुलांमुलींना ऐशा थट्टा करिती
अशांत वाटे धन्य जिवाला योजिति नवनव गमती

तोंच संथ ये सुधीर चालत, “ थांबा ” म्हणती सारे
“ प्रेम न कळेल या तत्त्वज्ञा, याला जाऊं द्या रे ”

भेदक दृष्टी चौरस यष्टी अगदीं साधा वेष
शांत मुखावर आनंदाचा ज्ञानाचा परिवेष

“ अरे जरा तरि पाउल उचलीं, दुसऱ्यां येणें आहे ”
सुधीर ऐकुनि घेई सस्मित आनंदानें पाहे

सुधीर गेला तोंच नेटका चकोर येई पुढतीं
दिसतां संवगडि समोर येउनि हस्तांदोलन करिती

“ चित्रकार या ! आज कुणाची छबी काढुनी देणें ?
आज कुणास्तव वदा सूट नी नवा टाय हा लेणें ! ”

“ आली, आली ! ” तोंच गर्जना सगळ्यां ऐकूं आली
चकोरही हो सामिल बघण्या क्षण थांबवुनी बोली

चटच्चट पाउल टाकित तों ये सुधा वाजती बूट
आनिमिष नयनीं बघती सारे सौंदर्याची लूट !

:: २ ::

वादविवादासाठीं जमले शिष्य नि गुरु दिसतात
दरियावरच्या लाटांपरि हा निनाद घुमुनी जात

पुढच्या बांकांवरी विलसती रंगीन अशा साड्या
मागें रंगामध्यें आल्या थट्टा आणिक खोड्या

प्राध्यापक कुणि येतां स्वागत होई टाळ्या मिळुनी
शिष्ट छात्र कुणि येतां वदती, ‘ आहे हां मारोनी ’

मुलगे बघती प्राध्यापक अणि मुली नीट निरखून
शोधुनि काढायातें धागा जाण्या स्वर्ग चढून

कुणी फेंकिती चिठ्ठ्या बोळे टाकिति कुणी विमानें
शिट्ट्या आणिक बांकपिटीही हो मधुनी हातानें

तोंच पातले शुभ्र रुपेरी दाढीवाले गुरुजी
स्तब्ध खवळला सागर होई एका निमिषामाजी

" आज मुलांनों ! भाग्याचा हा दिवस उगवुनी राहे
स्वोन्नतिचा अपणांला उत्तम मार्ग ठरविणें आहे

खुल्या मनानें धीटपणानें मुद्द्यांना मांडून
आत्मविचारांची महती द्या श्रोत्यांना पटवून "

असें सांगतां एक वदुं बघे आरंभाला कांहीं
तों हांसूनी सभा गरजली " अधीं नांव घ्या, भाई ! "

नांव सांगुनी पुढें वदत तो धिमेपणानें गोष्टी
नर जरि पिकविल सारी वसुधा कुणी न राहिल कष्टी

दुजा म्हणाला कशास पिकवा हें मनुजांचें पीक
हवें सांगणें आधीं मनुजा संततिनियमन शीक

कुणी म्हणे कीं श्रीमंतांना खालीं घ्या ओढुनियां
होतील सुखी सारे मानव संपत्ती वांटुनियां

कुणी म्हणाले साम्राज्याच्या तृष्णेला मोडूं या
लोकशाहिची ध्वजा खरी ती पृथ्वीवर रोवूं या

कुणि अडखळतां भलतें वदतां विरोध होई खूप
विचारसांखळि तुटतां कोणी स्थानीं बसत अपाप

देह कुणाचा, वेष कुणाचा, अवास्तव तसा जोर
श्रोत्यांमध्यें उठवी सहजीं जबर हंशा चौफेर

तास होतसे तरि न रंग ये जमल्या श्रोतृजनांत
सभा कुणावर खूष न होई मात्र असे रागांत

तोंच पुढें हो सुधीर, म्हणती ' या या ' होती स्तब्ध
वातावरणहि होउनि जाई आतुर नी निःशब्द

सुधीर बोले, " मित्रांनों ! जें सांगणार मी आहें
अंतरिं तुमच्या प्राणापरि तें सदैव खेळत राहे

ध्येयें कथितां उदंड येतिल आनंदाहर्षाचीं
परंतु अपणां हवीं पाहिलीं अपुल्या उत्कर्षाचीं

मानवता ही खुली ठेवणें जुलुमापासूनीया
ध्येय उच्च, पण काय करूं शकूं आपण हातांनीं या ?

हिंदभूमिला स्वतंत्र करणें यांत उन्नती अपुली
परवशता ही लाजिरवाणी मला झोंबते असली

अबला हरिजन निजभाषा ह्यां आधीं मुक्त करू या
मुळांस पाणी घालुनि पाहूं यत्न न जातिल वायां

टाकुन संस्कृत चला करूं या मायबोलिचा मान
परक्या बोलींमधुनी आणूं शास्त्र नवें वेंचून

स्त्रियांस समसम, बंधूपरि या हरिजनांस लेखून
हीन मनाची बूज घालवूं त्यांचा मान करून

ह्यानें सारे बांधव अपुले समर्थ झणिं होतील
मायभूमिच्या शृंखलाहि मग तटातटा तुटतील ”

उत्कटतेनें सुधीर बोले सभाहि होई दंग
कुणा न कळलें कशाकशानें गेला भरुनी रंग

सभा सर्व ती बहरुनि गेली हास्याच्या सुमनांनीं
सुधेसही त्या कितितरि झाल्या मधुर गुदगुल्या स्वमनीं

:: २ ::

सभा रंगली, सुधाहि फुलली सुधीरवच ऐकून
चकोरमनिं परि येत असूया प्रफुल्ल तिज पाहून

तयास गमलें आतां अपुलें वाग्वैभव दावावें
सभा सुधा या दोघांनाही चकित करुनि सोडावें

म्हणुनी उठुनी मेजापाशीं जाऊन उभा राही
खेळगड्यांची उत्तेजनपर वाणी ऐकूं येई

चकोर हंसुनी म्हणे, “ गड्यांनों ! स्वोन्नतिचा मी अर्थ
पदें पाडुनी करितों, ती जी स्वविकास करी सार्थ

मला न माहित होइल कीं ना उन्नति सम लेखून
अथवा परकें ज्ञान आणुनी अपुल्या बोलींतून

मी मानितसें विकास करण्या ज्ञान कुठूनिहि घ्यावें
इंद्रियगण हा खुला ठेवुनी अनुभवामृता प्यावें

तुम्हां योग्य जर गमला अपुल्या देशाचा उत्कर्ष
अधिं साधावा मलाहि त्यानें होइल अतिशय हर्ष

मी न असा कुणि इतिहासाचा गाढा पंडित कांहीं
परंतु मजला मानवते ना राजनीतिची ग्वाही

एकामागें आज झुलावें, शतकें दो शतकांनीं
पुन्हां पहावें तों तर उलटें झालेलें नयनांनीं

न मुळीं स्थिरता, राजकीय हे नेते जन झुलवीती
स्वार्थ महत्त्वाकांक्षा यांनीं विटाळली नयनीती

म्हणुनी म्हणतों जरी साधणें अपणां उन्नति अपुली
दृष्टि कराया हवी जराशी व्यापक आणि फुललेली

पहा गड्यांनों ! राष्ट्रें आलीं, गेलीं धुळिस मिळून
परि वाङ्मय नी कला राहिल्या काळाला जिंकून

अनंत अनुभव अनंत वैभव विखरुन राहे भंवतीं
तोच चतुर जो आणी सारें लोकांच्या दृष्टिपथीं

ओता शब्दांनीं वा रंगीं, शिलांमधीं वा ठेवा
कसाहि कुठुनी मानवतेच्यासाठीं मिळवा ठेवा

स्वतः रंगुनी, स्वतः भोगुनी कलाचतुर हे खास
अपुल्या आनंदास ठेविती भोगाया इतरांस

क्षणोक्षणीं हें जीवन फुलतें हंसतें नव सौंदर्यें
वेडें मन हें होउन जातें पाहुन नव माधुर्यें

कां न लुटा तीं, कोंडुन ठेवा त्यांचा मधु निष्कर्ष
वाचुन पाहुन भावी जनता डुलेल होउन हर्ष

जयास जें जें हत्यार येइल वापरण्या लीलेनें
वापरुनी तें हवें कराया शिकारीस वेगानें

महाभारता, ताजमहाला, अजिंठ्यास पाहोनी
क्षणभर काळहि नाश न करतां राहतसे थबकोनी

ह्याच कलाकृति अमर आमुच्या करिती अमुचा मान
यांच्या जीवावरी चालतों उंच करोनी मान

असें करूं या ! "—म्हणतां झाला कडकडाट टाळयांचा
क्षणांत गेला नूर बदलुनी साऱ्या सभागृहाचा

कुणीं फेंकिल्या टोप्या, कोणी 'ब्राव्हो चकोर' वदले
चकोरहस्तां धरुनी कोणी नाचायातें सजले

उदार चित्तें सुधीर होता टाळयांना वाजवित
चकोर होता पाहत विजयें सुधा जाहली चकित

सुधीर आणिक चकोर तुल्य प्रमुखांनीं ठरवीले
परी सुधीरा ऐकुनि होतें चित्त सुधेचें धालें

मुखावरी परि भासुं न देतां दोघांचाही मान
करी सुधा नी निरोप घेतां दोघां वदली 'छान'

## :: ४ ::

मजल्यावरतीं मजले चढुनी जातां बाजुस एका
कोण असे हें राहत येथें एकाकी तें देखा

घड्याळ करितें कटकट हा परि विचारांत किति चूर
कोण दिसे हा आरामासनिं ? भरत कशानें ऊर ?

हा तर सुधीर रंगुनि गेला मनस्तरंगीं खोल
आंदोलन किति पावे याचें होउन हृदय विलोल

बघाल तिकडे बुकें हारिनें कपाटांतुनी दिसती
अक्षय अक्षरिं हृद्गत अपुलें सांगाया उत्सुक तीं

खिडकींतुनि बाहेरी बघतां किनाऱ्याकडे लाट
फेस पांढरा शिरीं धरोनी दिसे काढितां वाट

सुधीर वदतो माझ्यापरि किति विचार करुनी थकले
तरी लाट ही अखंड ऐशी एकसारखी चाले

किनाऱ्यावरी असा तियेचा सदा चालतो घोष
स्तोत्र कुणाचें ? असे कशास्तव ? तोष असे वा रोष ?

कितीक दिन मी करीत आहें येथ सुखाची चर्चा
किती युगें परि लाट करी ही अशी किनारीं अर्चा

हिची न अर्चा अजुन संपली ! कधींहि ना सरणार
तैशी माझ्या चर्चेचीही गती काय होणार ?

किती सुखाच्या खऱ्या स्वरूपासाठीं झगडुनि गेले
मननचिंतना ध्यानधारणा करुनी थकुनी ठेले

सर्वोत्तम सुख नरें कोणतें मानावें ना ठरलें
भिन्नभिन्न किति तत्त्वज्ञानी वदती प्रियतम अपुलें

कुणीं मानिलें दिसणारें हें सारें खोटें आहे
ओळखुनी हें वागण्यांत तर सार सुखाचें राहे

कुणी सांगती दिसतें हेंही एकपरीचें सत्य
मानुनियां तें वागत असणें यांतच उत्तम सौख्य

दृश्यादृश्या चराचराला ओळखून आळवतां
कुणाकुणांला गमत अशानें खरें सौख्य ये हातां

अगम्य तत्त्वा सगुण करूनी लेववुनी बहु लेणीं
उच्च सुखाची उभारणी कुणिं केली गाउनि गाणीं

कुणीं मानिलें बुद्धिगम्य हें जें जें भंवतीं वसतें
मानवतेच्या विकासनीं हें ज्ञान तयाचें होतें

मानवता ही काढिल जों जों प्रकृतिधर्म शोधोनी
तों तों जाइल मानव सारा अत्यंत सुखावोनी

क्षणभंगुर संसार असूं दे, प्रकृतिधर्म उकलून
दिव्य सुखीं अम्हि विलीन होऊं दाविति कुणी वदून

कल्पनांस कुणि, कुणी साधनां मानुनि सार सुखाचें
मना आपुल्या सुखी कराया भुलुनी गेले साचे

कल्पनेंतले तरंग, मजले हवेंतले उठवून
मला न होतें सौख्य भोंवतीं मानव खिन्न बघून

असो, पाहुं या काय म्हणति हे तत्त्वज्ञानी सारे
आजवरी परि वाचुनि कोणां सत्य उमगलें सारें

मनांत करितीं विचार ऐसे कितीतरी थैमान
सुधीर होई अशा तरंगीं कितीकदां बेभान

मध्येंच होउनि आठविलेंसें ग्रंथ ठेवि उचलून
साफसूफ करि मेज आपुलें कांहीं सूक्ति म्हणून

खोलींतुनि बाहेर बघत तों मोटारी भिरभिरती
उसंत न दिसे जगा मुळीं क्षण, सारीं भिरभिरतातीं

:: ५ ::

नको पायऱ्या चढणें आणिक नको तुझ्याशीं वदणें
स्वर्ग गांठण्या खरेंच येथें लागे आधीं मरणें

दालनांत पाऊल टाकितां जो तो वदतो ऐसें
परंतु आल्यावरी तयाचें मन निमिषीं उल्हासे

गगनांतिल ही उंच हवेली बघे टकमका खालीं
तिथुनि वाहनें दिसती चालत पिपीलिकांच्या चाली

चमचमणाऱ्या सागरावरी छोट्या मोठ्या होड्या
येथुनि दिसती मंदसमीरणिं हलतां डुलतां थोड्या

कुठें अंतरावरी दिसतसे बोटीचाही धूर
आणि चालला जहाजताफा शीड उभारुनि दूर

दालनांत तर सौंदर्याचे नमुने अंवतींभंवतीं
कुठें टांगले, कुठें ठेविले गर्दी करिती नुसती

कुठें शंतनू निरखित होता धीवरकन्या नयनीं
अलख निरंजन मूर्ती कोठें राहियली अवतरुनी

सिंहापरि टिळकांची प्रतिमा कुठें लटकुनी राही
हिमालयापरि कुठें विभूती श्रद्धानंदांचीही

भूपत्रितया वेड लावती क्लिओपात्र सौंदर्यें
कुठें दिसतसे उभी सख्यांशीं वदतांना चातुर्यें

मेजावर लवलेल्या नग्ना व्हीनसचा नव पुतळा
सौंदर्यातें ओतुनि दावी ग्रीकांची शिल्पकला

तिवईवरतीं ताज पांढरा अति डौलानें विलसे
राखपात्र डोईवर धरुनी चिन्या विकट किति हांसे

कुठें टांगल्या काळ्या पिवळ्या शुभ्र चौकटी कोठें
कांहींवरतीं शुभ्र वस्त्र तें दिसे ताणलें नुसतें

कुठें काढिला हात बायकी, कुठें मुखवटा अर्धा
मूर्तामध्यें येणारांची जणों चालली स्पर्धा

घोडा एका कोपऱ्यांत त्यावरतीं रचले ढीग
चित्रकलांचे नमुन्यांचीही कुठें लागली शीग

तिकाटण्यावर वाढविलेल्या आकृतीस लावुनियां
चकोर होता रंगवीत तो नमुना पाहूनीयां

येउनि कोणी बसती स्नेही, काढिति वादा कोणी
कोणी कांहीं कामें ठरविति इतरां अवलेखोनी

गटारगप्पा, वितंडवाद नि कधिं सुंदरशी टीका
इथें चालते अशी सदाची कुणीहि येउनि ऐका

सर्वांनाही खुलें दार हें येथ कुणींही यावें
ऊन चहा नीं हनिड्यू छापा मुक्तमनें सेवावें

चकोरमन येथेंच रमतसे थारेपालट करण्या
महान विद्यालयीं जातसे नव्हता उत्सुक शिकण्या

चित्रकलेचा नादी नुसता कला न शिकला कांहीं
काम पाहुनी खूष जाहले आणिति कामें स्नेही

पुस्तकवेष्टण जाहिरात वा, छबी वाढवुनि देणें
ऐशा कामीं मिळे पुरेंसें, वर हौसेनें रमणें

"केलिस गमते शिकार पुरती वादामाजी परवां
खरेंच आहे, अतां कशाला असेल अमुची परवा"

असें वदोनी जात संवगडी मनांतलें बोलून
सुधातरंगीं तेणें बसला चकोरही रंगून

मला कशाला छान म्हणाली घोकित मनिं हें राहे
प्रेमिजनाला वाक्य कशाला शब्द पुरेसा आहे !

## : : ६ : :

कोण पाहती मुलें कोणतीं येति पाठशाळेला ?
चालक मोजिति आजला किती छात्रांचा गण झाला

काय मनोगुण हें न पाहती विकसन हो वा ना तें
हाय ! भारता, नाडणार हें किति दिन तुजला भलतें ?

शिकण्या म्हणुनी विद्यालयिं जरि किती जमा झालेले
सुधा सुधीर चकोर न एकहि त्यांत मनीं धालेले

चकोर रंगे चित्रकलेला सदैव आळवितांना
खरें स्फुरावें चित्त तयाचें रूपनिवड करितांना

काय अशाला प्राध्यापकजनवाग्जालांत गमेल ?
म्हणे नको ही ब्याद कशाला दवडा अमूल्य वेळ ?

वाचुनि वाचुनि सौख्याविषयीं सुधीर हो साशंक
मज न परीक्षा देणें सांगे स्नेह्यांना निःशंक

सुधेसही ना कळला कैसा शिक्षणपथ हा आहे
नेमियलेलें सर्व कांहिं ती वाचित सदैव राहे

इथें गुरुजनां मुळीं वाव ना योग्य मुलां घेण्यास
कार्यक्षम करण्यास योग्य वा ज्ञानातें देण्यास

इथें लाविलें ताडां माडां रान मात्र पाहून
आणि लागले लोक पिण्याला मडक्यांना लावून

पिढ्यांत तोंवर कैफ मुलांना मुळिं ना आंवरताहे
माज उतरतां दरेक हतबल झालों किति तें पाहे

तिघेंही गुणी परी तयांची अशी स्थिती ही येथें
काय दुज्यांच्या असेल नशिबीं तुम्ही ओळखा चित्तें

(मुलगे एकेपरी सुखी ते जीवनिं न का स्वतंत्र ?
मुली किती जरि शिकल्या तरि त्या असतातीं परतंत्र)

स्वार्थी कपटी अजाण शंकेखोर समाजीं कसल्या
टिकाव धरतिल ? महिला अमुच्या आम्हीं केल्या दुबळ्या

सुधा वसतसे कोठें जाते वदे कुणाशीं केव्हां
अशी मुलांची सदा चौकशी जमती कोठें जेव्हां

कसें फिरावें मनें मोकळ्या ऐशा कुजट जगांत
कन्यांविषयीं कुणीहि झोंकुनि येथें द्यावी बात

कुणी पाठविति पत्रें तिजला येति कुणी भेटाया
कुणी पाळतीवरी राहती सताविण्या तिज वायां

निर्लज्जापरि टवकारोनी खोडसाळपणिं बघती
दिसतां न दुजें धक्का –वदणें नको अशांच्या रीती

धीट सुधा परि शांत राहुनी कोणाही नच मानी
कोण विचारी वा अविचारी मनिं ठेवी ओळखुनी

उर्मटांसही ती दुखवी ना सरळपणें वागुनियां
उणें न काढी कधीं कुणाचें सर्पांची गणि दुनिया

वसतिगृहांतरिं तरीहि कानीं येत तिच्या भलभलतें
कोण काय नी कोठें कोठें मागें कुजबुजती तें

हीन तिचेहुनि तिच्या मैत्रिणी ज्या विद्यारूपानें
पिकवित होत्या तोंहि ठाउकें परि न दाविलें तीनें

कठीण भलतें मैत्री करणें अशा मुलींच्या संगें
बरें मुलांशीं जर बोलावें तरी कथानक रंगे

नच घाबरतां तरी तियेनें स्नेही दोघां गणिलें
सुधीर आणिक चकोर यांना विश्वासू लेखियलें

परी मनाचा स्थिर न ताजवा कधीं कुणाचा राहे
कुमारिकामन त्यांतुन हळवें लव न उपेक्षा साहे

कधिं रूपानें, कधीं गुणानें वर खालीं तो होत
मन आतुर हो तिचें ठरविण्या श्रेष्ठ कोण दोघांत ?

## : : ७ : :

" सुधीर थांबा ! जरा विचारूं, मिळेल का अवकाश
उद्यां तुम्हांला ? आपण जाऊं जवळ कुठें सहलीस "

" उद्यांच कां तें ? " " तसेंच कांहीं तेव्हां कारण आहे "
" जरुरीच्या पत्राची मी तर वाट पाहतों आहें

कुठें भेटणें सांगुन ठेवा आमंत्रण केव्हांचें ? "
" बोरिबंदरीं एक नंबरीं पांचा भेटायाचें "

" हजार टक्क्यांनीं मी येइन, पण आलों जर नाहीं
पत्र निकडिचें मिळून समजा कामा गेलों कांहीं "

असें वदोनी सुधीर जातां चकोरही आढळला
झटकन सरली सुधा पुढें नी लागे बोलायाला

“ चकोर ! आहे वेळ तुम्हांला उद्यां जरासा थोडा ?
माझ्यासाठीं काम आपुलें उद्यां जरासें सोडा ”

“ जरूर सोडिन काम आपुलें आपण जर बोलवितां
वेळाची का इतुकी आहे मजजवळी कमतरता ?

कुणिं सांगितलें इतका असतों कामामधिं मी दंग ?
वेळ दवडण्या कसातरी मी बसतों फांशित रंग

तुम्हि बोलावुनि जरी दाविलें कामाचें मीं ढोंग
नाहीं येणार का तुम्हांला मनामध्यें तरि राग ?

खुशाल सांगा येइन तेथें जेथें जेव्हां म्हणतां ”
“ बोरिबंदरीं एक नंबरीं पांचा या नच चुकतां ”

सुधा परततां वसतिगृहाला बेत करी चित्तांत
उद्यां आपुला वाढदिवस ये, घालवुं आनंदांत

सुधीर आणिक चकोर अपुले थोडे झाले स्नेही
कां न तयांशीं अशा निमित्तें वाढ करावी स्नेहीं ?

दोघांनाही घेउनि जाऊं नीट फराळ कराया
वेळ साहजिक मिळेल पुष्कळ गप्पागोष्टि वदाया

कितीक उठले सुधामनीं तें तरंग अति मौजेचे
कोण वदाया समर्थ होइल अशा मुलींच्या मनचे ?

दुसरे दिवशीं शुभ्र नेसुनी उभी नेमिल्या जागीं
वाट पाहते सुधीर किंवा चकोर दिसतो मार्गीं

ती बघते स्नेह्यांस आपुल्या, तिला पाहती लोक
रसिकां गमली खरी चारुता सोडुनि ये निजलोक

कुणी पाहती नयननीलिमा कुणी हंसतमुख गोल
कोणी बघती कुच लपलेले कोणी लाल कपोल

कुणी म्हणाले अशी नटी जर चित्रपटावर आली
लोटुनि गर्दी चित्रपटगृहें मोडुनि पडतिल खालीं

चकोर ये इतुक्यांत, म्हणे तो " उशीर झाला काय ?
वाट कुणाची पाहतसां ? का येथुन कोणी जाय ? "

" सुधीर नाहीं आले अजुनी, अतां न येतिल गमतें
आपण जाऊं चला " म्हणूनी लागे चालायातें

कुणि खांकरती कुणी हांसती हेवा कोणी करिती
कुणी खुणावति एकामेकां, जाऊं द्या हो म्हणती

" चकोर माझा वाढदिवस अजि तुम्हां मेजवानी मी
देणार असें, दावा मातें उपाहारगृह नामी "

" वाढदिवस जर तुमचा आहे युक्त मींच देणें ती
मजला कालच कळावयाला हवी गोष्ट ही होती "

असें वदत तों गाडी आली वसंतभुवनापुढतीं
सफेत पोषाखाचे नोकर उभे स्वागता करिती

:: ८ ::

बरोबर कुणी भगिनी दिसतां योग्य वाट दावून
परिचारक दे दारें उघडुन पंखाही सोडून

हिरव्या सतरंज्यांच्या वरतीं मऊ रुजामे होते
आंथरलेले, त्यांवर खुर्च्या मेजें कोचें कोठें

सुंदर मेजाजवळी एका खुर्चीला देऊन
सुधेस बसवी आणि समोरी राहे आपण बसुन
“ आलां नव्हतां कधीं इथें ना ? कधीं कधीं मी येतों
जनसंमर्दांचा ना येथें त्रास कधीं लव होतो
स्वच्छ नेटकें सुंदर मिळतें निवडक खाणें येथें
विश्रांती घेऊन येथुनी प्रसन्न जातां येतें ”
असें वदत तों परिचारक ये अदबीनें ऐकाया
काय हवें तें आणिक कथण्या योग्य काय सेवाया
स्वच्छ पांढऱ्या बशांत चमचा सुरी नि कांटा आला
खमंग ताजा पदार्थ नव ये एक जों न हो झाला
आवडनावड पुसुनि सुधेची पेयेंही मग आलीं
नुरे न्यूनता स्त्रीदक्षिण तो चकोर होता जवळी !
कोण न सांगा वळेल इतुकी दावुनियां चतुराई
सुधाहि बोलूं लागे थोडें दाखविण्यास भलाई
“ खरेंच सांगा चकोर, कोठें बोलाया तुम्हि शिकलां ?
वादविवादीं मोहक दिसली तुमची चातुर्यकला ”
“ मुळीं न शिकलों वक्तृत्वातें मला न ठाव्या रीती
चित्रकलेची आवड मोठी झाली मज बोलवती
मी न कुणाचा झालों चेला चित्रमंदिरिं न गेलों
आवड म्हणुनी गमतीनें हीं चित्रें काढित बसलों
प्रेमानें कुणिं, कुणिं हौसेनें मजलागीं सांगितलें
कामें करिती कशीं कशीं तें त्यांतुनि मीं उचलीलें
वाचियलें मग कलेवरी मीं विविध ग्रंथांतून
ध्येय ठरविलें अपुलें न दुजें चित्रकलेवांचून

कधिं आलां तर दाविन मातें किती शिफारसपत्रें
प्रदर्शनांतुनि कुठें मिळालीं ठेवुनि कुठलीं चित्रें
कधीं न गमलें कौतुक माझें इतुकें तरि होईल
नशिबाचा भरवसा अतां ये कुठेंहि तें तारील "

जरी सुधा ती ऐकत होती शब्द न् शब्द तयाचा
ठाव मनानें डोळ्यांनींही होती घेत कदाचा

कसें कशानें आणिक कां तें तिच्या न चित्ता कळलें
भयहि वाटलें परि बाहेरुनि धैर्य दावि ती सगळें

चकोर होता ओतित अपुलें वैभव पायांपाशीं
अशी मोहनी प्रेमी घालिति घेरायातें पाशीं

असलें रत्न कसें सांडावें पारखियानें बघुन
घ्यावें नच का बहु हौसेनें संग्रहांत ठेवून ?

" सुधीर असते आज इथें तर गंमत झाली असती
तत्त्वज्ञानाचीही अपणां कळली असती महती "

" सुधीर कसला येतो ? आला गप्पां ऊत असेल
वचनाचा त्या आठव कुठुनी तयांपुढें राहील ? "

सुधीर नांवा घेतल्याक्षणीं चकोरमुख लव उतरे
उमगुनि आलें स्नेही म्हणुनी ऐकियलेलें न खरें

गप्पांमध्यें खाद्यें पेयें झाल्यावर घेऊन
चकोर बोले, " चला जाउं या शोहि नवा पाहून "

सुधा उघडिते पाकिट तों दे चकोर पैसे सारे
खुषींतले परिचारक उघडिति भुवनाचीं त्या द्वारें

## :: ९ ::

चकोर येई दारापाशीं पोंचविण्यास सुधेला
वसतिगृहामधिं तोंच गलबला बंद एकदम झाला

“ जातों आतां, ” “ या ” म्हणतांक्षणिं कुजबूज जरा झाली
आपआपल्या खोल्यांमध्यें रीघ लागुनी गेली

स्वागतमंदिरिं कोणि न दिसलें होतें सारें शांत
सुधा आपुल्या खोलीमाजी निरखुनि जाई नीट

आरशांत मग पाही अपुला फिका चेहरा थोडा
केव्हांपासुन तिला लागला होता घरचा ओढा

बूट काढिले ठेवुनि दिधलें पातळ नी जाकीट
कपाट उघडुनि ठेवी अपुली मनीबॅगही आंत

तोंच उघडुनी दार म्हणत कुणि, “ बाई जेवायाचें
आज नाहिं का ! किती गड्यांनीं सांगा थांबायाचें ?

रोज अलिकडे पाहत आहें उशीर तुम्हां होतो
करीत आहे तुमच्याबद्दल तक्रारी कां जो तो ?

नका मला या म्हातारीला शिक्षा करण्या लावूं
मला असें ना खपावयाचें नका उशीरां येऊं ”

रोज अलिकडे म्हणतां आलें तिला हंसूं लोटून
म्हणे कुणींतरि दिधली दिसते म्हातारी चिथवून

सुधा म्हणाली, “ भूकच नव्हती मला लागली कांहीं
गडीमाणसां जेवायातें हरकत कांहीं नाहीं ”

“ भूक लागली नव्हती तर कां आधीं ना कळवीलें ?
उगीच नसतें अन्न एवढें तुमच्यास्तव शिजवीलें

आज कांहिंतरि विपरीत दिसे असें सुधेला कळलें
परंतु दमली होती म्हणुनी निद्रेलागीं वरिलें

निद्रेमाजी स्वप्नतरंगीं दंग होउनी जातां
तिला वाटलें बागेमाजी सहज चालतां फिरतां

मागें मागें हळूच कोणी येऊनी सरपटत
डंख कराया लपुनी बसलें गवतामाजी त्वरित

दिवा लावुनी उठुनी बसली घामानें डबडबुनी
म्हणे खुळी मी घाबरल्यें किति भलतें स्वप्नीं बघुनी

धीर करूनी निजे पुन्हां ती विश्रांतीच्यासाठीं
दिवसाचीं परि दृश्यें सारीं येति भुतांपरि पाठीं

चकोर कां हा दावित इतुकी अपुल्याजवळ भलाई ?
ठीक न झालें धन वेंचियलें त्यानें अपुल्यापायीं

मोडावें तरि कसें कुणाचें मन कांहीं बोलून ?
होउन जाऊं कधिं उतराई आपण धन वेंचून

सुधीर कां नच आले कालच ? उद्यां पाहुं या पुसुनी
मनांत येई बोलूंहि नये शब्द जरासें रुसुनी

हंसली अपल्यापाशीं आपण मूर्खपणा उमगून
म्हणे कसें हें मन तरि वेडें काय बसे बिलगून

चित्ततरंगीं हेलकावतां गेल्या श्रमुनि सुधेसी
निद्रामाता कवटाळुनि घे प्रेमें अपुल्यापाशीं

दुसरे दिवशीं हंसत रमत ती करि केशांची भूषा
लेवुनि आली विद्यालयिं ती साध्या नीटस वेषा

पोरें दिसलीं तोंच तियेला मिस्किलसें हंसतांना
आणि धरूनी चकोरहस्तां अभिनंदन करतांना

ओशाळुनि मनिं जरा चरकली गोंधळली क्षण तेथें
सुधीर दिसला इतुक्यामाजी बावरल्या नयनांतें
धावुनि गेली हरिणी जवळी घाबरुनी त्या पाहे
म्हणे, " कितीतरि बोलायाचें आज तुम्हांशीं आहे "

: : १० : :

ग्रांटरोडच्या स्टेशनांत ती सुधा येत पांचाला
न्याहाळुनि पाहते सर्वभर सुधीर का आलेला
हंसत डुलत तों आनंदानें वादविवादीं चूर
होउनि गेला तिजला दिसला सुधीर अंतरिं दूर
थबकत जाई, कोण बोलतें पाही दूरावरुन
निरोप घेउनि तोंच सुधीरहि तिच्याकडे ये बघुन
" ठरल्यापरि हा पहा आज मी आलों ना वेळेला ?
येउं न शकलों काल, लागलें जावें मज कामाला
महत्त्व होतें कालच कसलें मला न कळलें अजुनी ? "
" होता माझा वाढदिवस हो मजला गमलें म्हणुनी
तुम्हांस आणिक चकोरांसही सहज नेउनी कोठें
फराळ गोष्टी करावयाच्या मीं केलें बेतातें "
" मी नसलों तरि चकोर तरि ना वेळीं आला होता ?
—फार बोलका गुणी विनोदी सर्वांचा आवडता ! "
मोकळेपणें सुधीर वानी चकोरगुण आठवुन
वरवरीच कीं मनापासुनी बघे सुधा निरखून

सुधिराच्या ना मनांत दिसलें आगेंमागें कांहीं
प्रसन्न हृदयांतून तयाचा स्नेह दिसूनी येई

“ आज जुहूला जाऊं आपण कधिं का गेलां होतां ?
आवडेल तो तुम्हां किनारा फिरावयातें मोठा ”

असें म्हणत तों गाडी धडधड करित पातली तेथें
कोणी उतरत, कोणी धावत येउनि वेळीं शिरतें

पाटी दप्तर पाकिट किंवा पेटी चित्रकलेची
हातीं घेउनि उभी दिसतसे ओळ आंत बाळांची

हंसें तयांच्या दिसे मुखावर किती खोडकर चाळे
चालविले तयिं पाहुन खुदकन सुधेसही हंसुं आलें

वेळ जाहली स्टेशन आलें सँटाक्रूझ भकास
दोघें उतरुनि मंद पाउलीं लागति चालायास

“ सुधीर सांगूं ? मला न गमलें नीट कांहिंही काल
अतां वाटतें सगळा माझा गेला वाइट वेळ ”

सांगितली मग सर्व हकीकत पहिल्यापासुनि तीनें
सुधीर होता ऐकत सारें झालेलें गमतीनें

“ सुधीर, वेडी असें खरोखर मी, मजला ना कळतें
भोंवतालच्या पुरुषांचें मन, भयाभीत मी होतें

तुम्हां न ठाउक भेदक कामुक निर्लज्जपणा यांचा
काय करावें स्नेह तरि कसा यांचा जोडायाचा ?

खरेंच सांगा स्त्रिया अशा का तुम्हांकडे कधिं बघती ?
पुरुषांची परि असे कीं नसे बोला ऐशी रीती ? ”

“ मीहि त्यांतला, संकट कां मग ओढवून हें घेतां ? ”
“ तसें नव्हे हो, बहुतांबद्दल येत न का हें वदतां ? ”

“ तुमचा कांहींतरी जरासा गैरसमज होवोनी
गेला दिसतो म्हणुन दावितां उघड असें बोलूनी ”
“ अम्हां स्त्रियांतहि अनुदारपणा द्वेष नि मत्सर भरले
वैगुण्यानें जग हें सगळें दिसतें आहे खचलें ”
भारावुनि मन नयनिं सुधेच्या अश्रू झरझर आले
गाळिति टपटप पाणी नच का मेघहि जड झालेले ?
“ बरें राहुं द्या, विसरा क्षणभर जगतावरचा रोष
पहा नाच या लाटांचा नी ऐका मंथर घोष
यांस न पर्वा असे कुणाची, असें घुसळुनी अंग
भयकर धिंगाण्यांत राहती रात्रंदिन या दंग ”

## : : ११ : :

कमानाकृती भव्य किनारा लांब पसरला पुढतीं
दृश्य मनोहर दिसतां दोघें मूक होउनी जाती
डावे बाजुस वांदरा दिसे, वरसोवा उजवीस
गर्द नारळी लागुनि गेल्या दोन्हीही बाजूंस
लाटांमागुनि लाटा येती चाल करूनी वेगें
सैनिक–ओळी धावुनि येती शत्रूवर जणुं रागें
अंगाचीं वर्तुळें करोनी फुटती कांहीं लाटा
कांहीं पातळ पापुद्रापरि चालत येती वाटा
लाट ओसरे फेंसाची मग राही मागें खूण
शुभ्र कुटिलशी दिली कात जणुं सर्पानें टाकून

पाणिच पाणी दूर पसरलें दिसतें चंचल हलतां
तुरळक होडगिं त्यांवर कोठें दिसती डुलतां उडतां

काळ्या भुरक्या धूसर मेघीं दडतें केव्हां बिंब
कधिं तेजाचा लोळ दिपवितो दावोनी प्रतिबिंब

मुलें हांसरीं चालति लुटुलुटु चाळणि करिं घेवोनी
वाळूमाजी बघति बोगदे घरें हि वा बांधोनी

" खरें राहिलें बोलायाचें विस्मयांत गुंगून
सुधीर ! माझें मन कां होतें कातर जग पाहून ?

बाहिर कोठें पाउल टाका रोखियलेल्या नजरा
ओसंडत पापी दृष्टीनें सदा ओतिती जहरा "

"मी बोलूं का ? सुधे ! न इतुकी नीच पुरुषजाती ही
सौंदर्योत्सुक मात्र गमत ती तव ऐकुनियां ग्वाही

अम्ही पुरुषजन इतुके नाहीं वाटत सुरूप मातें
म्हणुनी सुंदर कांहीं दिसतां साश्चर्यें बघतों तें

परमेशानें सौंदर्याच्या भांडारा उघडीलें
मनुजा बघण्या चहूंकडे हें आहे विखरुनि दिधलें

अशिक्षित कुणी लंपट होउनि बघत तुम्हां असतील
परंतु सारी पुरुषजात का अशि वदतां येईल ?

स्त्रियाहि नच का कुठें कुणाची सलगी दिसतां थोडी
अनुदारपणें चिकटवितातीं भगिनींमध्यें खोडी !

प्रभाव सारा अज्ञानाचा अशींच नांवें ठपके
स्त्रीपुरुषांना लागतील हे सोसायातें शतकें

महिला किंवा पुरुषहि दोघें परिस्थितीचे दास
संस्कारांपरि वागति, आपण भलती करितों आस

वरुनि दाखविति चांगपणा हा इष्ट असे कीं नाहीं?
भीति मना कां द्यावी वाटुन पाहुन कुठें भलाई ?

वागत जावें खुशाल धैर्यें अवगणुनी कुजबुजणें
सरळपणानें वागत जातां कंड्या मरती मरणें ”

धीटपणाचे सरळ मोकळे ऐकुनि ते उद्गार
सुधामनाची वेल तरारे वचनसिंचनें गार

समाधानपर इतुकें नव्हतें आजवरी तिज कोणी
वदलें ऐसें हळुवारपणें शंकांना निरसोनी

चतुराईनें परी सुधीरें वळवुनियां मन तीचें
दावियलें रविबिम्ब उजळलें गगनीं नवलाईचें

पिवळे शेंदरि लाल भडकसे क्षितिजीं भरले रंग
उत्सुक भेटायास पश्चिमा स्वागतांत हो दंग

सुवर्णदंडापरी लांबवर बिंब जलीं थरथरतें
कृतज्ञतेनें लहरींनीं जणुं सागरास ये भरतें

“ सुधे ! पहा हें निसर्गवैभव मन रमतें किति यांत
परि नर कृत्रिम सुखांस शोधुनि त्यांत रमवितो चित्त ”

## :: १२ ::

चालुन चालुन दमून गेली पाहून सुधीरानें
म्हटलें, “ घेऊं आपण नारळपाणी चणे फुटाणे ”

“ जरूर घेऊं, ” सुधा म्हणाली, “ मला आवडे साधें
अन्न नि जीवन परी कुठुन तें शहरामध्यें साधे ? ”

वाळूमध्यें खात नि बोलत बसती कांहीं वेळ
लाट तयांशीं ये खेळाया शिवाशिवीचा खेळ

खाउनि पिउनी सुधा जराशी होतां ताजितवानी
म्हणे “ अतां मी लाटांमाजी पाहणार चालोनी ”

झरझरझर सरणारी वाळू हातांमध्यें घेई
खारट पाण्याची त्या थोडी चूळ भरूनी पाही

जरा धावली मोकळि हंसली अफाट वातावरणीं
कोंदट जग हें क्षणभर गेली पूर्णपणें विसरोनी

टाकित आलीं बेडूकउड्या तेव्हां कांहीं पोरें
करांत कर गुंफुनी जवळुनी गेलीं कांहीं थोरें

नारळींतल्या सान बंगल्या हळुहळु अंधुक होती
कुठें काजव्यांपरी सानुले दीपहि लुकलुकताती

लव भीतीनें लव गमतीनें लव आधारास्तवही
सुधीरकर ती करें धरूनी चढण चढूनी जाई

पुन्हां पाहिलें मागें दिसला तसाच सागर घुमत
म्हणे सुधीरा, “ असाच का हा दिनरातीं दुमदुमत ? ”

आधाराचें सौख्य मिळालें होतें हातालागीं
मना तुलाही असें हवें का पुसते चित्तालागीं

मार्ग आणखी विचार काटित आलीं तीं परतून
पोंचवुनि सुधा वसतिगृहाशीं सुधीर जात निघून

आली घरिं परि भलतें वाढुनि होतें ठेवियलेलें
वसतिगृहाचें होतें मंडळ आज जमा झालेलें

बोलावुनि तयिं विचारिलें कीं कोठें गेलां होतां ?
दिसती का ते किती वाजले, भ्रम का झाला होता ?

एक गरजली, “ वसतिगृहामधिं शिस्त न आतां दिसते
नऊ वाजले तरि विद्यार्थिनि बाहेर कशी फिरते ? ”

तोंच माइनीं लिखाण दिधलें मेजावर ठेवून
काल दिलेली होती कैशी ताकिद बोलावून

“ उद्दाम दिसे ” दुजी गरजली समितीमधली बाई
शिक्षा अथवा देहदंडही हवा कराया कांहीं

धुमसत ठेवा उगा कशाला ऐसें मनिं आणोनी
सुधा म्हणाली, “ खरीच झाली चूक आज हातोनी

नका मनामधिं आणूं कांहीं गैर न मुळिं झालेलें
मित्रासंगें आज जुहूला होतें फिरण्या गेलें ”

“ चूक जाहली, शिक्षा तर मग हवीच कांहीं केली ”
एक सभासद ठांसुनि वदली, दुजी स्तब्ध परि ठेली

म्हणे, “ मूल ही सात्त्विक दिसते शिक्षा योग्य न करणें
अशा वयामधिं हवें मुलींना जरा सांवरुनि धरणें

देहदंड वा शिक्षेसाठीं नाहीं अपुलें धाम
औदार्यानें विश्वासानें हवें कराया काम

नाजुक हळवें मन झालेलें गोंजारुनि घेऊन
थोरांनींच हवें वळवाया सौम्यपणा पतकरुन ”

त्यावेळीं तरि अनुभवशब्दा मानियलें सगळ्यांनीं
मुग्ध मनाची हत्या टळली अधिकाऱ्यांहातूनी

चित्त सुधेचें निद्रेपूर्वीं जरा तरंगत राही
चकोर आणिक सुधीर यांच्या तुलेंत रंगत कांहीं

:: १३ ::

सौंदर्याचें रूप सुधेचें मनीं आठवुनि येतें
चकोरहृदयीं आनंदाचें आणी उत्कट भरतें

आठवतां मग सुधामुखींचे स्तुतिमय हर्षोद्गार
चकोरमानस जीवन कल्पी सुंदर हिरवेंगार

हिरवी हिरवी चार पाहुनी सुखावतेंना हरिण
ऐटिंत डोलत चकोर चाले तेंवी आनंदून

तोंच कुणी ये काम मागण्या दाम दिले म्हणुनीयां
ओशाळुनि परि म्हणे राहिलें काम खरेंच उद्यां या

फुलाफुलांवरि फूलपांखरूं जसें रमे नी खेळे
सुधातरंगीं चकोरमानस करीत राही चाळे

काम कोठलें हातुनि होतें नेमियल्या वेळेला
चित्त सारखें खेळत राही सुधाकल्पनाखेळा

गुणां पाहुनी बोलायातें तयार कुणि ना होती
असेच सगळे कलावंतजन म्हणत ओरडत जाती

येत परीक्षाकाल जवळ तरि चित्रकलेच्या ध्यानीं
चकोर गेला रंगुनि वदतो होय कुठें वाचोनी

पुढें कधींतरि बसूं ठेविलें आहे सत्र भरून
धन मिळताहे तें घेऊं दे आधीं मज मिळवून

पिंजऱ्यांतल्या सिंहापरि घरिं करित येरझारीला
सुधीर सोडवि कोडें, ठरवी आत्मसौख्यसाराला

शंका अडचण आक्षेपांनीं त्याचे चित्तामाजी
चर्चा चाले, चित्त तयाचें अशांत होतें राजी

म्हणे जाउं द्या आपण नाहीं या वेळीं बसणार
प्रथम सुखाचें कोडें अपुल्यापुरतें सोडविणार

तया परीक्षा कधीं न अवघड अजुनि वाटली होती
परंतु महती नव्हती नुरली मनिंच्या प्रश्नापुढतीं

वाचनालयीं जावें घ्यावा हवा असे तो ग्रंथ
वाचुनि निकषा लावित राही स्वस्थ करीत रवंथ

ज्ञानोत्तर निष्क्रिय जन न मुळीं त्यास मानवे चित्ता
म्हणे जगाचें काय होत हित जगून असला नुसता

फुलें फुलुनियां येती जाती कुठें स्वतः तीं हाटीं ?
कुठेंहि असलीं तरीहि नच का सुवास देत रहाती ?

जगास गमलें तर येइल जग वाटल्यास लोभून
उगीच घ्यावा व्यर्थ कशाला हव्यासानें शीण ?

माथ्यामध्यें अशा तऱ्हेचा चाले काथ्याकूट
चित्त न झालें प्रसन्न अजुनी सुटुनी मनिंचें कूट

सुधा सुधेपणिं अभ्यासीं परि राहे होउनि चूर
मनीं म्हणे कीं हवें मिळाया यश अपणा भरपूर

आधीं नाहीं स्त्रीजातीला संधी मिळत पुरेशी
मिळुनि दवाडिली आपण जर ती होउनि राहूं दोषी

यत्न करोनी मिळवावें यश आपण तसें गुरूंना
मिळवुनि द्यावें, येती ऊर्मी अशा अंतरीं नाना

जरा विसांवा अभ्यासांतुनि मिळतां मात्र मनांत
पुढें काय हा विचार झटदिशिं येउनि चमकुनि जात

इतुक्यांचें जें होणें तेंची होइल अपुलें ऐसें
समाधान करि पुन्हां बळानें वाचायातें बैसे

जीवन कधिं का सरळ नेटक्या मार्गें वहावयाचें ?
जीवन कधिं ना सरळ नेटक्या मार्गें वहावयाचें !

वातावरणीं कधीं शांतता वरवर नुसती दिसते
उत्पातांची आंत जुळवणी भयकर चालत असते

## :: १४ ::

" कंटाळा मज वाचुन आला म्हणुनी येथें आलें
समजा आतां काम राहुनी तुमचें गेलें सगळें "

असें म्हणुनियां दारीं राहे उभी सुधा ती धीट
जागेपण वा स्वप्न असे तें चकोर राही बघत

होतें मनिं कीं घरीं सुधेनें अपुल्या येउनि जावें
दृष्टीखालुन कलेस अपुल्या कांहिं वेळ घालावें

सुंदर अपुलीं चित्रें सारीं एकवार पाहुनियां
न्याहाळावी अद्भुत अपुली चित्रकलेची दुनिया

मानसिं होतें तेंच जाहलें पाहुनि आनंदानें
म्हणे, " कशाला घेतलात हा त्रास ? भयंकर चढणें

बरें बसा या कोचावरतीं स्वस्थ रहा क्षण दोन
धापा टाकी वर येणारा अशा पायऱ्या चढुन

स्वागत तुमचें कसें करावें ? सांगितलें ना आधीं
मिळेल आतां चहा तेवढा, भोगा शिक्षा साधी

पहा चहा मी कसा बनवितों हीहि कला मज येते
तोंवर माझ्या चित्रकलेचे संग्रह चाळा नुसते "

कुठें मुलांचे स्त्रीपुरुषांचे अणि देखाव्यांचेही
फोटो होते निवडक सुंदर लहान मोठे कांहीं

तिला नाकळे शास्त्र तयांचें परी होत आनंद
म्हणे, “ मला ना पारख परि हो आनंदें मन मुग्ध ”

चहा घेउनी होतां दावी तैलचित्रनमुन्यांना
प्रदर्शनामधिं कधीं धाडिल्या तशा तसबिरी नाना

कपाटांतुनी काढुनि दावी किती शिफारसपत्रें
सुवर्णपदकें आणिक शाली कशा मिळाल्या कोठें

खचुनि राहिली होती भंवतीं चित्रकला जणुं नुसती
आज मिळाली तिला पहाया कलोपासनारीती

अवगणुनी सुख अंगा मोडुनि रात्रंदिन राबून
कशा कलाकृति निर्मिति जन तें तिज ये आज कळून

फलक तिकाटणें कापड तेलें घट्ट नि पातळ रंग
यांहिं निर्मिली अभिनवसृष्टी करि नरदृष्टी गुंग

अशा विचारीं चूर होउनी चकोरास ती म्हणते
“ कलाकृती ही काढित असतां भूकहि का हारपते ?

प्रश्न खुळा हा असेंहि समजा परि कुठली नवलाई
काढित असतां अत्यानंदीं जीव रमूनी जाई ? ”

“ प्रश्न न साधा, उत्तर याचें कधींतरी देईन
भाग्यानें परि अशी कल्पना येत मनास सुचून

वेळ भूक वा तहान यांचें भान न उरतें मग तें
मन हें भारुन जातें आणिक कलम चालतें भलतें

दिव्य असे क्षण माझ्या भालीं आले नाहिंत थोडे
परंतु येथुन दुर्मिळ ते क्षण मन हें मानित वेडें ”

असें म्हणत तों खिन्न होउनी चेहराहि लव पडला
पाहून मना सुधा म्हणे कीं प्रश्न उगा हा केला
" असें कुठें का होतें ? " वदुनी निरोप घेई त्याचा
चकोर थांबुनि गेला तेणें पुढतीं बोलायाचा

उतरुनि तेथुनि म्हणे पाहुं या सुधीर करिती काय
उतावीळ हो मंथर चढले कसेतरी वरि पाय
ग्रंथ घेउनी आरामासनिं वाचित कांहीं बसला
सुधीर दिसला तिजला तोही आनंदोनी वदला

:: १५ ::

" ठीक ठीक, शोधीत मठी ही कशातरी आलात ?
त्रासावांचुन फुका न कोणा सांपडते ही वाट !
बरें येउनी इथेंतरी का बसण्या जागा नीट ?
बसा, बुकांनीं असे व्यापिली जागा होउनि धीट

खुशाल त्यां मी राहूं देतों तींच मला, मी त्यांना
माझ्याजवळी तींच बोलती कधिं करितां प्रश्नांना
कुणि शंकांना उत्तर देती, कुणि हृद्गत ओतीत
सांगतातही अपुले अनुभव कोणी प्रेमभरांत

जगांत कोठें खळगे खांचा नीट दाविती प्रकट
सौंदर्यातें दाविति कोणी, कुणि विद्रूपा विकट
अगाध मानवतेचा भरला इथें असा इतिहास
गभीर कांहीं मुक्तमनानें करिताती परिहास

काव्य कथा इतिहास पुराणें शास्त्रें तत्त्वज्ञान
इथें आणिलें आहे वेंचक बघण्यातें वाचून

शिष्यवृत्ति वा पारितोषिकीं मिळवियलें जें वित्त
यांत वेंचुनी टाकियलेंसे रंजविण्यातें चित्त

मोहक शैली, विचार सुंदर, यांत कितीतरि भरले
माझें अंतर या मित्रांनीं आहे मोहुन नेलें

पराक्रमांच्या परिश्रमांच्या अचाट कितितरि गोष्टी
केल्या वीरांनीं त्या वाचुन कधीं स्वमन हो कष्टी

आपण कोठें, कुठें पुरुष हे, किती गुणांचे स्वामी
धन्य धन्य नर होउन गेले कितिदां हें वदतों मी

पृथ्वीवरचे वीरपुरुष नी तत्त्वज्ञहि अधिकारी
संशोधक वा संत जाहले जन्मजात उपकारी

वाचियले मीं, वाचुन मन परि शंकेखोरच राहे
सौख्य खरें हें कशांत नांदे अजुनि हुडकितों आहें

कुणिं दिधलें का उत्तर याचें, सोडविलें का कोडें
असें पाहतां होउन जातें वाचनांत मन वेडें

प्रश्न मनोहर आहे नच का ? सोडाविलें जर यातें
खरी परीक्षा दिधल्यापरि मज गमेल चित्तीं वाटे

विद्यालयिंच्या सर्व परीक्षा संकुचित क्षेत्राच्या
मर्यादा ना तेथ कुणींही स्वतंत्र मानायाच्या

म्हणुनि ठरविलें परीक्षेस ना ह्या सत्रीं बसण्याचें
उत्तर अपुल्यापुरतें आहें काढित मम कोड्याचें

अंधुक अंधुक कधीं तरल तें भासुन होई प्रकट
दूर दूर कधिं लोपुन जाई लोटुन घोंटाळयांत

कधीं वाटतें अतां उलगडा होइल सारा निमिषीं
हृदय सुखावुन जातें परि तो भासच होई शेषीं

कितीक खपले असल्या कांहीं प्रश्नां सोडवितांना
तसाच मीही येथें आहें सोडवीत शंकांना

कधीं वाटतें सार सुखाचें सुखी दुज्यां करण्यांत
मानवजीवनहेतू वाटे आहे अंतिम ह्यांत

पारख आहें नीट करित मी उत्तर हें वाटून
नाहीं पूर्णपणानें पटलें मच्चित्तास अजून

सोडवीन हें कोडें त्याविण न मी स्वस्थ बसणार
केला आहे असा मनाचा अतांतरी निर्धार

खरें, विसरुनी गेलों आधीं विचारण्याचें थोडें
कामा आलां किंवा अपल्या उगाच झुकलां इकडे ?

बडबडण्याची आहे मजला अशी जराशी खोड
त्यांतुन ओळखिचें कुणि दिसतां वदणें वाटे गोड "

आनंदाच्या लहरि सुधेच्या चित्तीं होत्या उठत
हंसतमुखावर बिंब तयाचें प्रकट होउनी दिसत

:: १६ ::

" सुधीर, जातें, उशीर झाला, जवळ परीक्षा आली
आणि तयारी माझी तर ना अजुनि नीटशी झाली

म्हटलें, भेटुन यावें बघुनी अभ्यासीं किति रमलां
वाचुन वाचुन होता माझा जीव जरासा श्रमला "

“ मुळीं परीक्षा नसे देत मी, अतां उलगडा झाला ?
खुशाल वळवा पाउल इकडे जर कंटाळा आला ”

नादी दिसले दोघेही परि सुधीर वाटे सरल
चकोर वाटे तिला पाहतां चित्तीं होई तरल

भास तरी हा माझा नाहीं ? सावधान राहून
पुढें ओळखूं स्वभाव यांचा पारख नीट करून

अशा विचारीं घरिं परते तों मेजावर ठेवून
दिधली होती तार कुणींतरि तांतडिची घेऊन

हृदय धडधडे, उघडें पाकिट करितां हो थरकांप
आणि वाचतां संदेशा त्या तिला लागली धांप

तिच्या सख्या कुणि धावत आल्या बघण्या तार कुणाची
तोंच धाडकन पडली वाचुनि भाषा संदेशाची

देहवेल ती होती कांपत, शब्द न ओठीं फुटत
सांगवे न तिज काय होत तें अश्रू ओघळतात

किती रडूं ये आंवरे न मुळिं किती जरी आंवरलें
प्रचंड दुःखाघातीं मन का होइल झणिं सांवरलें ?

कुणीं आणिलें पाणी कोणीं शिंपुनियांही दिधलें
आकस्मिक पितृनिधनाचें तों वृत्त तयांना कळलें

एक पित्याचें छत्र तेवढें, दुजें जवळचें नव्हतें
आणि अतां तर तिला सोडिलें जगीं एकलें तातें

काय कुणाला वदेल ती नी सख्या तरी तिज काय
म्हणतिल, ऐसा प्रसंग आला खरा ओढवुनि हाय !

एका क्षणिं ये मनांत सांप्रत आधीं काय करावें
तोंच मनीं ये योग्य असें का तातांनीं टाकावें

क्षणैक तातांवरतीं क्षोभे, क्षणैक वदते ऐसें
छे, हौसेनें लोटुनि दिधलें असेल त्यांनीं कैसें ?

इथें न लिहिलें अंत कशानें झाला त्यांचा जलदी
शुश्रूषेची मित्रांनाही असेल झाली गरदी

विचार संपे एक न तों ये अश्रूधारा नयनीं
वर्षाकालीं सरीवरी सर ये जैशी धावोनी

म्हणे अतां हें दावुं कशाला कुणां वदन हें माझें
कुणाकुणांवर घालूं आतां माझ्यासाठीं ओझें

माई आल्या बोलत बसल्या कितितरि गोंजारून
श्रीफल कणखर, असे गोड परि जीवन आंत भरून

हळू तयांनीं सांगुनि दिधलें निश्चिंतपणें राहीं
आधिं परीक्षा, सावकाश मग देणं अपुलें देई

सहानुभूती दाविति साऱ्या तिजला पुसती आतां
पूर्वीच्या का त्याच सख्या ह्या तिच्या वाटलें चित्ता

एकलि होतां तिला हुंदका आवरतां नच येई
टाकि उसासे, जडजड अंतर सारें होउनि जाई

तिनें ठरविलें तातगृहाला येण्याचें जाउनियां
तिला वाटलें अपुल्या स्नेह्यां परि घ्यावें पुसुनीयां

रडरडरडुनी किती वेळ ती हुंदहुंदके देई
काळ परी का कोणासाठीं स्थिर होउनियां राही ?

काळ चालला पुढें आणखी गेला देह थकून
पांगळुनी मन जातां गेला डोळा लव लागून

## :: १७ ::

लौकर उठुनी, जाइ जवळच्या चकोरसदनीं आधीं
अजुनि न होती उतरुनि गेली त्याची चित्तसमाधी

वाटत होतें चित्तीं त्याला कशि आकर्षुनि आली
वाक्चातुर्यें दाक्षिण्यें कीं कला होय ही वाली ?

येथें येउनि वाटे झाला आनंद तिला खास
न का म्हणाली मुग्ध होत मन पाहुनि चित्रकलेस ?

बरें पाहुं या —म्हणुनि उठे जों कामा हातीं घ्याया
नाजुक टिकटिक दारावरतीं ये त्यातें ऐकाया

दार उघडुनी पाही तों त्या सुधा दिसतसे दारीं
केविलवाणी मूर्त कळेना कशि हो चार प्रहरीं

कुठें तेज तें आज निमालें ? कोमेजुनि कां गेली ?
गेली लावण्याची भरती ? कोठें लपली लाली ?

“ काय जाहलें ? ” असें म्हणत तों नयनीं दिसलें पाणी
बघणाराचेही हृदयाचें होई पाणी पाणी

म्हणे, “ निमाले तात, सोडुनी कालच मजला गेले
येथुनि गेल्यावरी घरीं मज तारेनें हें कळलें

असो, आज ही जात असें मी माझ्या तातगृहाला
सांगायातें आलें तुम्हां, निरोपही घ्यायाला ”

सौख्याचा डोलारा बसला असा एकदम खालीं
चकोरमनही गोंधळुनी क्षण गेलें तसल्या काळीं

ओलीं नयनें पदरें पुसतां सागराकडे वळुनी
“ अतां ऐकतां माझें कांहीं ? ” चकोर बोले उठुनी

“ जातां तर जा, परंतु तुमच्या असे वित्त का जवळ ?
कराल तेथें काय धनाविण असे प्रश्न हा सरळ

कालच कामाचे मम हातीं नगद दोनशें आले
घेउन जा हे, देउन टाका देणें जर झालेलें ”

अवचित औदार्यातें पाहुनि सुधा होत मनिं चकित
मन न मोडतां, शब्द न वदतां हातिं धना ती घेत

दुःखें उतरे कशीतरी ती मळमळ मनिं परि वाटे
घेतियलें धन भीत आंत मन दुःख अंतरीं दाटे

दुःखाचे कढ घेई गिळुनी सुधीरदारीं येई
तिला पाहुनी आश्चर्यानें तोहि चकित मनिं होई

वेल कशी ही करपुनि गेली काय दुःख तरि झालें
करां धरुनि तो तिचें निहाळी मुख झालेलें ओलें

“ सुधा ! सुधा ! हें काय पाहतों ? काय जाहलें बाई ? ”
सुधीरशब्दा ऐकतांक्षणीं अश्रूंची हो घाई

दृष्टीपुढतीं तिला दिसेना शब्द फुटेना पुढतीं
“ वेडी वेडी, सांग सांग, तर कसली वाटत भीती ?

काय निमाले तुझे पिताजी ? तुला केधवां कळलें ?
वाइट झालें अरे अरे रे कठिण होउनी गेलें

ही घे खुर्ची, जरा स्वस्थ हो, लव आपणही बसला
पुरुषापरि तो पुरुष असोनी अश्रु न त्या आंवरला

म्हणे, “ सुधे हें घट्ट करूनी मन घे आतां बाई
असे कितीतरि कष्टी प्राणी एक त्यांतली तूंही

वियोगमय हें जीवन आहे पुरें ओळखीं बाळ
ग्रासायातें उभा असे हा सर्वांलागीं काळ

काळाशींही झगडुन मनुजां लागे जगतीं जगणें
सोडुन लागे द्यावें धैर्यें दुबळ्यांपरि हें रडणें ”

वदे थोपटुनि पहा मजकडे जाण्याआधीं नीट
वदन भासलें सरींत दिसल्या विधुबिम्बापरि थेट

## : : १८ : :

सुधिराकडुनी सुधा परततां तरारुनी लव गेली
जरी अकल्पित दुःखभरानें मंद होउनी ठेली

आपुलकीनें तिच्चिया दुःखीं नव्हतें कुणि सम झालें
पाहुनियां तें चित्त सुधेचें होतें अतिशय धालें

अपुल्या दुःखीं दुःख वाटतें असें कुणीतरि आहे
वाटुनि ऐसें दुःखाश्रूंतच आनंदाश्रू वाहे

पुन्हां कल्पना आली आपण कशास धन घेवोनी
उगाच राहत असों कुणाचें असें ऋणी होवोनी

नाकारावी कशी कुणाची मदत धावुनी येतां
आपणाहि उतराई वागुनि ऐसें येइल होतां

अशा विचारीं मनीं होत ती गभीर केव्हां केव्हां
परि अश्रूंच्या सरि कोसळती वियोग मनिं ये जेव्हां

तातगृहीं जाउनी तियेनें सर्व कांहिं आंवरिलें
बापाच्या मित्रांनीं तिजला मुलीपरी वागविलें

आणि कथियलें तातेच्छेला तुझी परीक्षा होतां
निवडुनि काढी सोबती कुणी तुझ्या मना आवडता

देणें देउनि काय ठेविलें तातें तेंहि बघून
पुन्हां परतली वसतिगृहा ती काळ न बहु दवडून

तिला वाटलें अतां परीक्षा पास न होइल सारी
फुकट किती दिन गेले, नाहीं झाली नीट तयारी

काय करावें ऐसें पुसण्या चकोरास ती गेली
म्हणे, “ बसुन घ्या जमेल तितुकें संधी आहे आली ”

सुधीरास परि पुसतां वदला, “ नाहीं काय तयार ?
आपण वाचूं येत नसे तें, राहिल ना तक्रार ”

उगीच घोळ न, मात्र नेमकी मुख्य कल्पना देई
विषयहि तेणें झट उलगडुनी ध्यानिं नीटसा येई

वर्षभरी ऐकुनी गुरूंना नीट न जें कळलेलें
स्पष्ट अतां हो तिच्या मानसा समजावुनि दिधलेलें

तीही नव्हती जड बुद्धीची ग्रहण करी ती तूर्ण
वेळेवर होऊन निघाली तिची तयारी पूर्ण

परीक्षेहुनी येतां सांगे काय काय जें लिहिलें
ऐकुन घेउन सुधीरमन तें दिसे मुदित झालेलें

म्हणे परीक्षा देण्या माझी मी जरि बसलों नाहीं
माझी मैत्रिण तरी परीक्षा देण्यातें आहे ही

अशी ‘ मध्यमा ’ देत परीक्षा सुधा मोकळी झाली
म्हणे चकोरा सांगुनि येऊं दिली परीक्षा सगळी

म्हणे, “ मोकळी झाल्यें संपुन सर्व परीक्षा आज
यथेच्छ विश्रांती घ्यायातें, अतां न उरलें काज ”

चकोर सांगे, “ अतां विसांवा घ्या बहुत श्रम झाले ”
सुधा म्हणे, “ छे ! सुधिरांना ते माझ्यासाठीं पडले ”

" सुधिरांनीं का लिहिले पेपर ? " " त्यांनीं जें सांगितलें
तेंच परीक्षेमार्जी आलें आणि तेंच मीं लिहिलें !

येइन आतां पुनः पुन्हां मी " असें म्हणुनि झणिं गेली
चकोरास परि रुचली नाहीं ती भाषा झालेली

झोंपुनि कांहीं वा आलस्यें दिनराती जों गेल्या
नुसतें राहुनि उगें सुचेना तिजला कांहीं केल्या

कदा वियोगें कदा एकलेपणें तिला टोंचावें
तिला कळेना एकएकटे क्षण कैसे कंठावे

## : : १९ : :

अतां विचारी चित्त, सुधे तूं काय जगीं करणार
पित्यामागुनी तुझी काळजी कोणाला गमणार ?

सर्वांना का कुणी काळजी करणारें जगिं मिळतें ?
हेंहि खरें पण तो जन असुखी ज्याचें कोणी नसतें !

अफाट जगिं या भीति वाटते तुजला ना एकटिला ?
कां न च वरिसी महिलांनीं जो मार्ग असे चोखळिला ?

मनास मन का हवें मिळाया असें जिवाला वाटे ?
विवाहोत्तरा प्रीतीमाजी तुला गमति का कांटे ?

प्रश्न चालले परी ऐकिलें ओरडतांना कोणी
चला पहाया सभा चालली निषेधार्थ खवळोनी

निषेध कसला कोण करितसे, म्हणुनि वाचतां वृत्त
कळलें कामानटीनिषेधा सर्व पारशी जमत

एक पोरगी नटी जाहली गेली बोलपटांत
काम कराया म्हणुन जाहला अनर्थ हे म्हणतात

खवळुनि गेलें पित्त तियेचें म्हणे, " पारशी छंदी
इतुके असुनी स्वतः, स्त्रियांना करिति तेवढी बंदी

स्त्रीपुरुषांना असम लेखुनी भिन्न नियम योजून
किति महिलांचा विकास नर हे ठेविति नष्ट करून !

असेच सारे स्वार्थी दिसती पुरुष जगाचे पाठीं
संरक्षक हे म्हणती सारें करितों महिलांसाठीं

असें, एवढें, इतुकें, न पुढें असे मार्ग रोखून
दुबळ्या आम्ही करुनि ठेविल्या गेलों पुरुषांकडुन

रुचेल तें तें अमुचें आम्ही करूं बनूनी धीट
पुरे अतां हें मानभाविपण, अगदीं आला वीट "

सुधीर आणिक चकोर वदती ह्याविषयीं तरि काय
कुणास देती दोष पाहण्या उत्सुकतेनें जाय

"काय आणिलें आहे हातीं ?" " पहा, पुरुष हे तुम्ही
अबलांचे नेते, संरक्षण काय करितसां नामी ?

किती काळजी घेतां ? आम्हां ठेवितसां पडद्यांत
दृष्टि जनांची, सूर्याचेंही दर्शन लाभुं न देत !"

चकोर बोले, " वृथा असे हा हल्ला पुरुषांवरतीं
तुमच्यापैकीं किति अनुसरल्या टाकुन खोटी भीती ?

कोणि न कोणां ठेवी मागें समाज जोखी पाणी
तुडवुन त्यातें पुढें निघाल्या नमितो जोडुन पाणी

असेल हिम्मत तरी स्त्रियांनीं वदण्या यावें पुढतीं
अभिनंदन करण्यातें कां नच येत पुढें स्त्रीजाती ?

महिला अमुच्या चरफडणाऱ्या बडबडणाऱ्या नुसत्या
कृति न तयांच्या हातुन होइल शिकल्या कितिही जरि त्या

जोंवर घेतां मानुन बंधन तोंवर असेच सारे
पंजरिं पक्षी पाळुन त्याला लागुं न देतिल वारें

मला न येई स्त्रीजातीची दया मुळींही आतां
साहस धैर्य धडाडी यांची त्यांच्यामधिं कमतरता ”

“ अशी न दिसते नव्या मनूच्या मुलींत मजसि उणीव
तुम्हीहि मत बदलाल आपुलें होइल जर जाणीव ”

“ सोन्याचा उंबरठा होवो, कपाळ जावो फुटुनी
बंधु पारशी योग्य वागती निषेध ऐसा करुनी ”

“ दिन गेले पुरुषांचे आम्ही गमेल तेथें जाऊं ”
निरोप देतां चकोर वदला, “ अम्हि आनंदें पाहूं ”

रागानें चरफडली म्हणते चकोर किति अनुदार
का खिजवाया बघतो मजसी बोलुनियां अविचार ?

: : २० : :

“ खुळे खुळे हे लोक पारशी, निषेध कसला करिती ?
निषेध करुनी आंतिल ऊर्मी नष्ट कधीं का होती ?

विकास होण्या हवी द्यावया स्वतंत्रता पुरुषांनीं
योग्य अनुभवें त्याज्य त्यांतलें स्त्री देइल टाकोनी

उगाच दाबुन मनोहीनता वाढविताती सारे
महिला करिती पुरुषांवरतीं टीकेचे मग मारे ”

आनंदुनि किति जात सुधामन ऐकुनि ते उद्गार
म्हणे पहा हा किती विचारी, हृदय अतीव उदार

सळसळुनी मनिं लाट अनावर झणिं कसलीशी आली
ऐकायाचें बोलायाचें सारें विसरुनि गेली

तिला न वरतीं बघवे, आला भाव मनीं दाटून
तरलतरंगीं रंगुनि गेली मनिं कांहीं वाटून

शून्यदृष्टि ती होई केव्हां, केव्हां कातरनयना
वांछियलेलें असेंच का तूं असें विचारी स्वमना

सुधीर थांबवि भाषण अपुलें म्हणे नसे अवधान
कुठेंतरी मन हिचें गुंतलें, बोलूं येतां भान

सुधा म्हणे, " कां थांबलांत हो ! बोला पुढतीं बोला "
कसलातरि मनिं डोलत होता खालींवर हिंदोळा

" लक्ष न माझ्या बोलण्याकडे, " " ऐकत सारें आहें
कां न बोलतां ?" "कोण न बोले ? मीहि न बोलत का हें ?"

नजरेलागीं नजर भेटतां पुन्हां लज्जिता हो ती
दोघांच्या अंगांतुनि लहरी अदृश्य चमकुनि जाती

" दिवसांतुन एकदां तरी का केस करितसां नीट ? "
करीं कंगवा घेउनि राहे उभी सुधा ती धीट

सुधीर समजे अधीर झालें आज हिचें मन कांहीं
हळुवारपणें म्हणे, " सुधे तूं नेहमिंची अजि नाहीं "

" आहें, आहें, अगदीं आहें, काय दिसे हो बदल ? "
" उपयोगाचा सांगुन नाहीं, म्हणुनि न वदतों सरळ "

केसांतुनि कंगवा फिरोनी येई भांग निघूनी
" आरशांत लव बघा केस ते येती कैसे दिसुनी ? "

‘वळण न केसांचें जरि कळलें, कळेल आवड तूझी
आजकालच्या महिलांची ही काय अभिरुची ताजी ”

नीटनेटकेपणा कुणाचें खुलविल नच सौंदर्य
त्यांतुनि होतें उभें साधना तारुण्य नि चातुर्य

“ बरें दिसे कीं ! ” म्हणतां आल्या स्मितलहरी उसळून
हर्षित हो मन सुधिरें बघतां तिजलागीं हरखून

तोंड वळविते सागराकडे मिष करुनी बघण्याचें
न कळे कां तें होय अनावर हृदयीं धडधडण्याचें

नयनिं आंसवें येती अस्थिर सुधीर चित्तीं होई
म्हणे, “ना कळे आजच तुजला काय होतसे बाई ! ”

खांद्यावर कर ठेवुनि पुसतां म्हणे, “ न कांहीं झालें
स्मृती जाहली बाबांची नी डोळां पाणी आलें ”

“ बरें जाउं दे, करूं चहा मी ? घेशिल थोडा काय ? ”
“ मी असतां कां ? ” विस्वर वदते —चहा कराया जाय

कोणि न बोले, चहा जाहला वाद न झाला पुढतीं
दोघांचींही हृदयें स्पंदन आंतुनि पावत होतीं

निरोप देतां “ येशिल केव्हां ? ” पुसे तियेस सुधीर
“ म्हणाल तेव्हां ” वदुनी गेली सुधा ओढुनी पदर

लज्जा म्हणजे अबलांचा किति नाजुक भेदक बाण
शिकार झाली म्हणून समजा होतां शरसंधान

:: २१ ::

“ प्रेम कशाचें घेउन बससी ? प्रेम न राहे जगतीं
प्रेम सांगण्या वदण्यापुरतें मनोविनोदासाठीं

प्रेमाखालीं सदा वावरे विषयलालसाभूत
तारुण्याचा बहर संपतां प्रेमहि संपुष्टांत !

मद्य संपतां कवण मद्यपी हातीं ठेवी पेले ?
यौवन सरतां प्रेमाचें हें अत्तर होय उडालें !

देहलतेवर यौवनफल हें जोंवर लटकुन आहे
तोंवर नरपक्षी हा तेथें सज्ज लुटाया राहे !

यौवनावरी नजर आणखी प्रेमाचा मुखिं पाठ
तूं हृदयेश्वरि ! मी हृदयेश्वर हा शब्दांचा थाट ! ”

“ मूर्खा ! हें वदलास कोठलें ? पाठ सांग का केलें ?
असत्यबाणाला तूं गमतें प्रखर जहर लावियलें

असें जगीं या असेल तर का नरजीवन चालेल ?
कोण कुणास्तव होम कराया उत्सुकमन होईल ?

चकोर खोडुनि काढी अपुल्या मित्राला रागानें
“ प्रेम कळाया व्हावा वेड्या, स्त्रीलाभहि भाग्यानें ”

“ खरें, सुधेचें मन कोणावर असे असें तुज वाटे ?
सुधीर आणिक तूं यांविण ना कोणाला ती भेटे

लठ्ठ आळशी कोठुन तिजला आवडेल तो चित्तीं ?
नारींची तर दृष्टि साहजिक असे सुंदरावरतीं

सडपातळ तूं काळविटासम डौलदार तव चाल
तुझियावांचुन सुधामृगी ना वश कोणा होईल

धनहि खेळतें पायापाशीं तुझिया चित्रकलेनें
स्त्रीमन होई विवश पाहुनी नटला पुरुष धनानें ”

चकोर हंसला, म्हणे, “ वेडगळ तुझ्या कल्पना गमती
असतील खऱ्या इतरांपुरत्या त्यांत हिची ना गणती

स्वतंत्र गमते सुधा, तिला ये अन्यायाची चिरड
जनांत उठल्या कंड्यांनींही तिजला येई भिरड

हवें वळविलें सावज नाजुक पाशांनीं हळुवार
ध्यानिं न यावा डाव योजिला चतुराईनें फार ”

“ सुचलें ! देतों अंकिं उद्यांच्या बातमीस छापून
विद्यालयिंच्या विश्वामध्यें अभिनंदन तव करुन

भाग्यें सुटला चित्रकार आजि रमणीच्या हातून
सुंदर मगरी माणिक नातरि बसली असती गिळुन

वाचतांक्षणीं चिडुनी जाइल म्हणेल लिहितो ऐसें
संपादकवच अतां पाहतें सत्यच होतें कैसें ?

खरी युगत ही योजुन बघतों वळली तर वळलीही
नातरि ह्यानें अंक उद्यांचा खपेल जादा कांहीं ”

पोट जाळण्या संपादक हें बोलुनि गेला खालीं
चकोरचित्ता आवडे न तें घर्म येतसे भालीं

कुटिल मार्ग का कधीं कुणाला मानवलासे जगतीं ?
स्वार्थी नर पण कपट करूं दे अल्प सुखाच्या साठीं

वानित माझी चित्रकला नी वाक्चातुर्या फुलल्या
अजुनी माझ्याजवळ सुधेच्या वृत्ति कशा ना खुलल्या ?

आदर दावित कौतुक करते पण ठरते ना येथें
का अर्पियलें असे कुणा मन ? स्नेहें नुसत्या येते ?

शिरा तडातड उडती न सुचे जरी सांचलें काम
वांछित न मिळे सुधामनाचा शांत असा विश्राम

असो करूं या प्रदर्शनाचें तयार अपुलें चित्र
कशास दवडा वेळ ? वाटतें स्त्रीजीवित अति चित्र !

## : : २२ : :

सुधा परतली गृहास आली मोहुनि नव जादूनें
मनास आली नवी पालवी मनिंच्या उत्सुकतेनें

बोलायाचें आपण कैसें असें मनामधिं येई
मी वदलें तर अमर्याद का गणतिल सुधीर हृदयीं ?

राहवणार न अतां बोलल्याविण हें माझ्या जीवा
किति धडधडतें कसें सांवरूं माझ्या हृद्राजीवा ?

मना तुझी ही वांछा परि का जर न फळाला आली
होइल काय दशा वद सांगें मिळुनी नकार बोली ?

मला न देतिल नकार माझ्यासाठीं कितितरि केलें
असे तयांनीं नातर असतें पूर्वीं मज डावलिलें

कुठें फिराया घेउनि गेले आणि वाचिलें कांहीं
म्हणुनि जन्मभर कोण घोरपड गळयांत बांधुन घेई ?

येशिल केव्हां असें कशाला पुशिलें असतें त्यांनीं
बरि पीडा ही जाते ऐसें गमतें जर आंतूनी ?

तरंग ऐसे चालत मानसिं चित्त न राहे थीर
गमे कुरंगी विवश जाहली लागुनि कोमल तीर

म्हणुनी लौकर पुन्हां निघाली सुधीरभेटीसाठीं
तोही होता आतुर हृदयीं कांहिं वदाया गोष्टी

त्याचें होतें भारुनि गेलें चित्त समाधानानें
हृदयसागरीं ऊर्मी उसळत होत्या आनंदानें

प्रश्न तयानें अपुल्यापुरता होता सोडविलेला
आणि हेंच तो होता आतुर सांगायास सुधेला

सुधा पाहतां अकल्पितपणें दाराशीं आलेली
वृत्ति तयाची मोदभरानें अगदीं बहरुनि गेली

म्हणे, " सुधे, मीं आज माझिया सोडविलें प्रश्नाला
वागायाचाही मजपुरता नीट उलगडा झाला "

" मलाहि हंसरी मूर्ती पाहुन कोडें तुमचें सुटलें
असें वाटलें, सांगा मातें काय तुम्हांला सुचलें ? "

" ज्ञानाचा ना अंत कुणाला आजवरी सांपडला
सौख्याचा ना एकच पथ हा कोणातेंही रुचला

म्हणुन ठरविलें घेण्याचें जें ज्ञान जगीं ये उद्या
मात्र जुन्याशीं नीट घ्यायचें आधीं पडताळुनियां

विचार नुसते तलम असोनी लाभ कुणाला जगतीं
म्हणुनि ठरविलें श्रमण्याचें मीं दीन अपंगांसाठीं "

बुद्धीचें तें तेज आणखी हृदयांतिल कारुण्य
होतीं विलसत वदनावरतीं लाधुनियां चैतन्य

गरिबांसाठीं द्रवणारी ती मूर्ती पाहुनि पुढतीं
मनांत चमकुनि जाय कल्पना ' द्रवेल ही मजसाठीं ? '

" सुधीर, तुम्ही धन्य धन्य जगीं, कोडें तुमचें सुटलें
असे किती जन या वसुधातलिं संशय ज्यांचे फिटले ?

संशय-आवर्तांत राहती किति गुरफटुनी कोणी
कुणास धीर न होई कांहीं करण्यातें हातोंनी

दीनां लाभो तुमचा सुखकर पाठीराखा हात
भाग्यवान ते "–पुढें न बोलूं शकली कांहीं मात

खालीं सागरिं सळसळ होती लाट जलामधिं उठत
सुधा-अंतरीं अशीच कांहीं लाट अनावर येत

" सुधे ! सुधे ! हें सकाळपासुन काय चाललें आहे ?
अंतर गेलें असे कशानें भारावून तुझें हें ? "

शब्द न फुटती, अश्रु चालती रोगी हो बेजार
वेड्याला ना क्षणभर सुचला काय हवा उपचार ?

## :: २३ ::

" सुधे ! वाटतें आज मनानें तुझ्या घेतला ध्यास
नवीन कांहीं मोहरली मनिं तुझ्या दिसतसे आस

आज मोकळी नेहमींपरी तुझी दिसेना चाल
खळबळ कांहीं तुझ्या अंतरीं चालतसे बेताल

असें ठेवशिल कोठवरी तूं मन अपुलें कोंडून
ना राहिल तें दबून ऐसें उशी घेतल्यावीण

स्पष्ट वदूं ? मज आज भाससी झालिस चंचलचित्त
आतुर दिससी अर्पायातें सर्वस्वाचें वित्त

असें कशानें आज जहालें ? प्रेम न साधी गोष्ट
दिसल्या कोणावरतीं मोहित होणें न बरें स्पष्ट

वेडी वेडी, तुला न कळतो स्वार्थहि अपुला नीट
देऊं तरि मी दोष कसा तुज ? मोहच हा वाईट

धनिक पिता तव कुलशीलानें लोकांना माहीत
अवगणुनी कां उडी कुठेंही घालिसि तूं खाईत

जरा, थांब मी आहें तुजला मदत कराया येथें
शोधुन काढूं दोघें आपण मान्य तुला हो स्थळ तें "

" चला, उठा तर याद्या काढा, शोध कराया जाऊं
अनुरूप मला कुठल्या प्रांतीं वर सांपडतो पाहूं

कुलशीलाच्या गोष्टी पुष्कळ आजवरी ऐकियल्या
धनिकांच्या घरिं चालतात ज्या रीतीही पाहियल्या

धनिक पिता तर वांटुन टाकूं संपत्ती ही सारी ?
भणंग आणिक अपंग होउन येऊं तुमच्या दारीं ?

म्हणा—' न माझें स्वरूप सुंदर तूं तर रंभा हंसरी
तुला हांसतिल म्हणतिल मूर्ति न दिसली का गे दुसरी ? '

घरांतुनी मी बाहिर पडलें दिसलांत तुम्ही पुढती
म्हणुनी आली माझ्या हृदयीं प्रेमाची ना भरती ? "

" सुधे सुधे, तूं थट्टा कसली मांडित अससी येथें ?
तुझिया जन्माची ही सांगड तरि बडबडसी भलतें ? "

" तुम्हींच मातें सर्व शिकविलें, बडबड ना गांठींची
या ज्ञाना कां भलतें म्हणतां ? ही तर विद्या तुमची "

" संसाराची मुळिं न कल्पना करतां शिरसी तेथें "
" किति वर्षांनीं संसाराची वदा कल्पना येते ? "

" स्वतंत्रता ना मिळेल येथुन, परवशता ती पुरती "
" कुणास सांगा स्वतंत्रता ती आहे जगतावरतीं ? "

" पति कसला बघ, कसाब समजें मानेला चिरणारा
संशयराक्षस त्याचा हस्तक पाळतिवर फिरणारा "

" कुणास भीती दावितसां ही ? दाविन उघडें करुनी
चित्तसुमन हें एक परिमळें ठेलें कैसें भरुनी "

" कीर्ति महत्त्वाकांक्षा यांची होइल सारी होळी "
" स्वजनाविण मज रितीच वाटे त्यांहीं भरली झोळी "

" दो निमिषांच्या मोहें असली बघत पुढें उद्यान "
" छे ! छे ! चुकलां बघत असें हो चतुर बागवान "

" सर्व सुखाचा होम मांडिला आहेसी तूं आज "
" आयुष्याचें होमाविण का असतें दुसरें काज ? "

" यौवन, सौंदर्य नि आकांक्षा आशा जातिल विलया "
" जाउं देत हो प्रेमचंद्र त्या जागीं येइल उद्या !

हा चंद्रोदय होतां सार्थक होइल या जन्माचें
ऐसें होणें कोठुन असतें नशिबीं सामान्यांचे ? "

" काय म्हणूं मी ? " " म्हणा शिकवितें मीच, ठाउकें मजला
' आजपासुनी कधीं न अंतर देईन सुधे तुजला ' "

## :: २४ ::

मावळता रवि दिसे तळपतां उघड्या खिडकींतून
सगळी खोली गेली होती त्या तेजें उजळून

करुनी वंदन सूर्या ग्रंथां हातीं गीता घेई
गंभीरपणें सुधेपुढें तो सुधीर येउनि राही

" आजपासुनी कधीं न अंतर देईन सुधे तुजला "
करिं कर धरुनी गंभीरपणें सुधीर बोलुनि गेला

" पुन्हां म्हणा बघुं शब्द मघांचे " पुन्हां शब्द तो बोले
आतुरता कोमलता ऋजुता यांनीं मन हो द्रवलें

" अजुन एकदां " म्हणे सुधा ती तोहि वदोनी डोले
आनंदानें डोळे झाले दोघांचेही ओले

त्रिवार वदतां वाक्य तियेचा हर्ष न मावे पोटीं
तनुवेलीवर थरक चालली दिसुनी आली ओठीं

" माझ्या विद्यार्थ्यानें म्हटलें जें त्या मीं शिकवीलें
म्हणुनी बक्षिस देण्याचें मीं आहे मनिं ठरवीलें "

" म्हणशिल तें तें थोडें " वदतां झणिं विळखा घालूनी
म्हणे, " अतां मी झाल्यें तुमची या निमिषापासूनी "

प्रेमाची गालावर उठतां अद्भुतशी नव खूण
लाजुन राहे सुधीरापुढें अधोवदन होऊन

प्रेमाच्या मनिं लहरी उठती थरथरथर सळसळुनी
आणि जात ती शरीरवेली स्वेदकणीं नाहोनी

इच्छा पितयाची होती कीं एकलें न या जगतीं
तिनें रहावें, आज जाहली पूर्णा भाग्यानें ती

तिलाहि झाली स्मृती तयाची मन आनंदें धालें
आशीर्वादास्तव पितयाच्या शिर तीनें लववीलें

जीवन वाटे गार गार मग ऊर भरोनी जाई
म्हणे, " जाउं का ? उद्यां दुपारीं येइन मी लवलाहीं ! "

तिला न कळलें आजच कां तें दिसे जगत आनंदी
सर्व भासलें तिजला भंवतीं हंसतांना स्वच्छंदी

आपण आनंदी तर जगतहि दिसतें तैसें अपणां
अजुनी नव्हतें माहित म्हणुनी विस्मय गमला सुमना

इतुक्यामाजी चकोर दिसला तिजला येतां पुढुनी
तिला कळेना लपवावें कीं गुज द्यावें सांगोनी

म्हणे पाहुं या नूर तयाचा गमलें तर बोलूंही
आनंदानें म्हणुनि चकोरा निहाळीत ती राही

उतरुन गेलें होतें त्याचें वदन, आपुल्या नादीं
चालत होता निर्विण्णपणें चूर होउनी खेदीं

बघुनी पुढतीं फुललेल्यापरि सुधा हांसुनी आली
वृत्ति चकोराची दु:खातें क्षणभर विसरुनि गेली

म्हणे, " आज तुम्हि दिसतां फुलल्या आनंदानें कांहीं
खरेंच वदतों आहें ऐसें, तोंडदेखल्या नाहीं ! "

" आनंदीं मी खरीच आहें, " सुधा हांसुनी सांगे
" अहो ! परीक्षा संपुन गेली, अतां काच ना मागें

खावें प्यावें कुठेंहि जावें, कांहीं नवें बघावें
आवडत्या विषयामधिं मन हें खुशाल विहरूं द्यावें "

" अभिनंदन मी करतों तुमचें तुम्हीतरी सुख भोगा
जगतामध्यें सुख अनुभविण्या सर्वांना ना जागा "

" आज पाहतें उदास तुमचें चित्त असें झालेलें
कथाल का तें जरी सकाळीं तुमच्या सदनीं आलें ? "

" या मग पाहूं " म्हणे तों तया होऊनी आठवण
करिंचा चाबुक–अंक देउनी निरोप घेई हंसुन

## :: २५ ::

वसतिगृहामधिं येतां आवरि सुधा नेटके केश
आठव होई कसे जाहले सुदृढ अतां नवपाश

मना, सांग मज अतां केवढा फरक तुझ्यामधिं झाला
म्हणे मन तिला तूंच सांग किति फरक तुझ्यामधिं झाला

आनंदाच्या ऊर्मी होत्या उठत सारख्या हृदयीं
प्रेमानें किति भारुन जातें चित्त नवीन प्रणयीं

म्हणे घेउनी आढेवेढे सुधीर नसते बधले
असलें आग्रहवच जर आपण नच असतें पतकरिलें

किती विचारी स्वार्थत्यागी महान हा विद्वान
खरीच आहें धन्य धन्य मी पुरी भाग्यवान

पुन्हां मनानें तिनें वंदिलें तातपदांना स्मरुन
आणि विनविलें आशीर्वादा नयनीं जल आणून

जेवायातें उशीर होता म्हणुनी ‘ चाबुक ’ उघडी
तों पाहियली टीका जहरी अपुल्यावरतीं उघडी

सुंदर मगरी तिला लेखिलें चकोरास माणीक
अभिनंदन करण्यास सज्ज हो संपादक आणीक

रागानें ती चडफडली परि शांत होउनी ठेली
सांगितलें सुधिरांनीं कंडच्या मरती मरणें अपुलीं

परी ठरविलें क्रोध आपुला चकोरास दावावा
आणि मनाचा शांतपणाही शेवटिं ना सोडावा

काय जाहलें असेल ? दिसला चकोर कां निर्विण्ण
तिला न उमगे, चित्त न राही विचार केल्यावीण

बरें असूं दे ! काय जाहलें कळेल वेळेवरती
दुजियाची नच चिंता इतुकी बद्ध मनें कधिं करिती

सकाळ होतां प्रसन्न चित्तें सुधा पातली दारीं
चकोरकळि उमलुनि नव्हती त्या ठेली प्रहरावेरी

कितीक आराखडे टांगले खोलीमध्यें नुसते
मधीं चौकटीवरी झांकलें कसलें चित्रहि होतें

उंचट पेल्यामध्यें होतीं लांबट कलमें ठेलीं
फलकाजवळी ठेवियलेल्या रंगांच्याही ओळी

जवळ बाटल्या तऱ्हेतऱ्हेच्या तेलांनीं भरलेल्या
होत्या एका कोपऱ्यामधीं जुळुनी ठेवियलेल्या

" चकोर, मज ना हेतू कळला, काय छापिलें हो तें ?
तुमच्या माझ्यावर शिंतोडे आहेती गमती ते

झालीं विद्यालयें बंद, तरि बंद न यांचीं तोंडें
कोण वाचती वाचक यांना खरेंच आहे कोडें !

संपादक तर दिसतो स्नेही, चिंता तुमची करितो
पण नालस्ती तुमची असली पत्रांतुन कां वरितो ?

अशी फजीती केली असती याची मीं जाऊन
परंतु कुत्रीं भुंकायाचीं मरोत तीं भुंकून

आतां सांगा, काल कशानें दिसलां हो निर्विण्ण ?
खुली हांसरी वृत्ती तुमची जाय कुठें लोपून ?

विनोद आनंदाचा निर्झर तुम्हांमधुनि जो वाहे
काय असें झालें कीं लपुनी आज कुठें तो राहे ?

हरकत नसली तर सांगा मज उघडें दुःख करून
माझातरि हां हलका होतो दुःखभार बोलून

मीहि धावलें तुमच्या येथें आनंदीं दुःखीं वा
मित्रांशीं मन बोलायाचा मला वाटतो ठेवा ”

चाबुकांतली निन्दा झाली व्यर्थ असें पाहून
चकोर चातुर्यानें काढी सुचलें कांहिं नवीन

## :: २६ ::

“ मी राजी ना कथावयातें इतरां अपुलें दुःख
हलकें करणें त्यांच्या नसतें करांत मज ठाऊक

अपुले भाग्यीं नाहीं ऐसें मानूनी मी स्वस्थ
बसणार असें, असे कितीतरि असती दुःखग्रस्त ”

“ अधिक चौकशी करितें ऐसा अर्थ नका मनिं घेऊं
बोललांत तर उपाय सुचतो का तो आपण पाहूं

मी न म्हणे कीं तोड आपणां सांपडेल अगदींच
पहावयाची करुनी खटपट अपुल्या हातीं हेंच ”

“ तुम्ही बायका ! इतुकी खटपट तुम्हां कोठली होते ?
ज्ञान महत्त्वाकांक्षा यांची हांव तुम्हांला नसते ”

“ चकोर, माहित तुम्हां न माझा स्वभाव इतुका कांहीं
जरी मनानें घेतियलें मी सोडणार कधिं नाहीं ”

“ ठाउक होइल आतां तुमची धमक किती ती आहे
कालपासुनी खराच हतबल होउन गेलों आहें

हें घ्या, वाचा पत्रक, येथें संधी कीर्तीसाठीं
आतुर होउन गेला आहे जीव याचियापाठीं

सिमल्यामध्यें प्रदर्शन असे प्रमाण भारी मोठें
नामवंतजन परीक्षक तिथें असती मोठेमोठे

हजार रुपये, सुवर्णपदकहि ठेवियलेंसे त्यांनीं
पाठविण्याचें चित्र ठरविलें मीं केव्हांपासोनी

चढाओढही त्यांत सुचविली पौराणिक चित्रांची
पाहणार ते कोण गांठतो कोटी कल्पकतेची

शंभरावरी झाले असतिल कच्चे नमुने नुसते
अशांनींच मग पक्की अपुली खरी कल्पना बनते

अशी करूनी स्थिरहि कल्पना मांडियली योजून
जवळजवळ मीं चित्रहि केलें, पुरतें नमुन्यावरुन

कालपासुनी साधन परि तें येणें शक्यच नाहीं ”
खरीच त्याची भाष सुधेला मुळींच कळली नाहीं

“ कसलें साधन ? कुठें हरपलें ? अन्य न मिळतें का तें ? ”
चकोर वदला, “ लाज पहा ही ऐशी येथें नडते ”

“ यांत कशाची लाज ? कळूं दे स्पष्ट वदतसां काय ”
म्हणे, “ तुम्हां ना ठावें कैसें चित्रच तयार होय

पुरुष बायका नमुने म्हणुनी नग्न उभीं ठेवून
आकृति काढुन घेतों त्यांतें झपाझपां पाहून

अंगाचे विक्षेप ठेवणी भावहि कोमल नामी
उतरवितां ते येत अशानें योजियलेल्या कामीं

मूल एक अशि राहत होती उभी काम मी करितां
गरिब बिचारी फणफणताहे तापानें ती आतां

अतां दोन दिन राहुन गेले चित्र पुरें करण्यास
बरी जाहली तरी ना तिला सोसतील आयास ”

“ शोधुन काढिन वदाल ती स्त्री काम करिल जी ऐसें
अडचण पाहुन घेइल कांहीं थोडे जादा पैसे ”

मान घालुनी खालीं बसला आठविण्या जणुं कोणी
म्हणे, “ दावुं का नवी कल्पना सुचते ती बोलोनी ? ”

“ खुशाल बोला, ” त्वरित म्हणाली “ भीति कशाची त्यांत ?
मला न आतां भीति वाटते कसलीही जगतांत ”

“ म्हणणें सोपें किती असे हें, प्रसंग येतां परि तो
मी मी म्हणणाराही तेव्हां लटपटुनी नर जातो

हेंहि कधिं खरें पुरुष तेवढा दुर्बलता दावील
आणिक अचाट साहस तेव्हां स्त्रीजातीच करील ”

: : २७ : :

स्त्रीजातीची अशी प्रशंसा केलेली ऐकून
सुधामनाला जरा वाटलें बरें खरें आंतून

पुनः पुन्हां हो चकोर अपुल्या धैर्याविशिं साशंक
रुचत न होतें तिच्या मनाला हें अगदीं निःशंक

वाढवुनीयां जिज्ञासा नी स्त्रीजातीचा निकष
चकोर झाला उद्यत अपुल्या वाक्शरसंधानास

म्हणे, “ पहा हें चित्र उघडिलें तयार किति झालें तें
एक आकृती अतां काय ती पुरती करणें येथें

तडागकांठीं वृक्ष किती हे निबिड लागले असती
आणि त्यांतुनी निर्झर कैसे धावत उतरत येती

मयूर कोठें, सारस तुरळक कोठें आढळताती
मृगशावक हे जलपानीं किति दंग जाहले दिसती

तारुण्याची तपोव्रताची सीमा निर्धाराची
दिसे मूर्ति ही कुशाजिनावर बसल्या मुनिवर्याची

ध्यानमग्न यतचित्तेंद्रिय मुनि बसला बघुनी रानीं
मोहायातें काढियलीसे लावण्याची खाणी

हवी तियेमधिं अजुनी आली तारुण्याची वीज
कारण बाह्य इथें ना कांहीं शृंगाराचा साज

लिंबकांतिच्या अंगावरतीं कुटिल कचांचा भार
उरीं कठिणसे उन्नत हे स्तन नितंब गोलाकार

तडागांतल्या अंबुकणांनीं निथळुनि थरथरणारी
जरि उघडी परि झटकन अपुले केश झटकुं बघणारी

नादासरशा उन्मीलितशा त्या मुनिच्या नयनांना
लुब्ध कराया हळुच वळोनी बघणारी मृगनयना

इथें काढणें —अशा भावना ऐसें वातावरण
निर्मायातें हवें तियेनें दिधलें स्फूर्त करून

भाव उमटतांक्षणिं ह्या चित्रा येइल नवचैतन्य
कोण बालिका श्रमुनी न कळे करील मजला धन्य !

तुम्हांस नाहीं मुळीं कल्पना मन:स्थिती कशि होई
बूजच नाहीं रहात तेव्हां शरीरधर्मांचीही

सुंदर नमुना पुढें उभा जरि अम्हां ठोकळा वाटे
मनुजभावना लव ना अमुच्या हृदयीं तेव्हां दाटे

मूर्त धातुची ओतियलेली अथवा दगडाचीच
मानुन असतें काम चाललें, कुठुन कल्पना नीच ?

दिव्यानंदा ओतित असतों कलेंतुनी जो स्फूर्त
अमूर्त कैसें प्रकट करावें धडपड चाले मूर्त

आणिक जर का सांपडला क्षण दिव्य नि चेतोहारी
अक्षय कीर्ती मिळवुन जातो तसल्या क्षणीं चितारी

उभ्या राहिल्या तन्वंगीला मिळे यशाचा अंश
धन्य धन्य तो चित्रकार, तो देश नि त्याचा वंश

धन्य ती खरी कलेस उघडें शरीर दाखविणारी
आनंदास्तव सौंदर्यातें रंगवुंही देणारी !

अशी असे का महिला कोणी तुम्हांस जी माहीत ? ”
“ चकोर, नाहीं खरेंच कोणी ये माझ्या दृष्टींत ”

“ मिळवाल तुम्ही नांव सुचविलें जर त्या धीट मुलीचें ? ”
“ प्रयत्न करुनी वळविन मन मी वदूं कितीदां वाचे ? ”

“ सांगुं तुम्हांला नांव तियेचें ? ” “ ओळखितें मी तिजला ? ”
“ हो तर ! ” “ सांगा नांव बघूं मग सारा प्रश्नच सुटला ! ”

“ सुधा तियेचें नांव आणि ती समोर बसली आहे ! ”
ऐकुनि कालापरी गार ती सुधा होउनी राहे !

## :: २८ ::

अनपेक्षित उत्तर ऐकोनी गोंधळली ती फार
म्हणे, “ कराया मला हवा लव ह्याचा मनीं विचार

वदेन संध्याकाळीं येउन होइल कीं ना काम ”
गभीर होउनि गेली आला फुटुनी भालीं घाम

वसतिगृहाला थेट परतली तिला न होतें सुचत
डोकें होतें भणाणलेलें सांवरूं न ये त्वरित

आरशापुढें उभें राहुनी रूप आपुलें पाही
घवघवलेलें तिला भासलें आणि खरें होतेंही

वसंत होता फुलला देहीं उसंत नव्हता प्रेमा
दिसल्याविण राहील कशी मग तनुवेलीवर सुषमा

स्नान उरकलें चार घेतले घांस येउनी स्वस्थ
मंचकावरी पडुनि राहिली होण्यातें निद्रिस्त

विचारावली परी न सोडी तिजला कांहीं केल्या
क्षणभर साऱ्या शक्ती तिजला हतबल झाल्या गमल्या

काय करावें ? काय मनाचा करूं तरी निर्धार ?
भ्याडपणाची येऊं बघते अपुल्यावरतीं हार

खरेंच माझ्या धैर्याची नी स्त्रीजातीची लाज
राखायाचा प्रसंग येउनि ठेलासे हा आज

भगिनी माझी पोटासाठीं न का राहिली नग्न ?
श्रीमंतीचें कां मानावें वागण्यांत मीं विघ्न ?

कला न कळुनी पोटासाठीं तिनें मार्ग हा धरिला
दिव्य कलेच्या उपासकास्तव जर तो मींही वरिला

होइन का मी दोषी अथवा गणितिल मज उपकारी
हिंदकलेच्या पायीं खोट्या लाजेला त्यजणारी ?

सुंदर सुंदर म्हणती जें जें सारें तें सौंदर्य
अविनाशी का ? भंगुर सारें म्हणताती कविवर्य

मम देशाचें वैभव ह्यानें वाढवितां येईल
रसिकजनांच्या आनंदाची वाढ न का होईल ?

पुढाकार हा असा कुणींतरि हवाच आतां धरिला
मार्ग न् मार्गेहि हवा मोकळा स्त्रीजातीला केला

कीर्ती होइल, कसास उतरूं, होऊंही उतराई
चकोर–उपकारानें आहे जड झालेली डोई

सुधीर म्हणतिल काय परी मज –त्यांचा प्रश्नच कैसा ?
कलाविकासास्तव नाहीं का मार्ग वरित मी ऐसा ?

शिवाय माझ्या सौख्यासाठीं करितिल सर्व सुधीर
फुलुनी जाई आठव होतां दयिताचा गंभीर

सुधीरांस ना सांगूं आपण कसे ऋणी आहोंत
फेड करूं या पैशांनीं वरि कष्टानेंही त्वरित

असें म्हणोनी लोळत राही सुधा मंचकावरतीं
गेला लागुनि डोळा थोडा गात्रें थकलीं होतीं

माई येउनि गेल्या त्यांना बोलायाचें होतें
परंतु त्यांनीं आवरिलें मन पाहुनि गाढ सुधेतें

झोंप संपतां उठे घड्याळाकडे नजर टाकीत
उशीर झाला, सुधीर असतिल माझी वाट पहात

माई येउनि तोंच म्हणाल्या, “ परवांपासूनीयां
वसतिगृहाला सुटी म्हणोनी जागा पाहूनी या

पैसे चुकवा, परवां येथुन सामानहि न्या थोडें
सुटी संपतां सुरूच होइल पुन्हां आपलें गाडें ”

“ बरें ” म्हणोनी सुधा निघाली माईशीं हांसून
म्हणे सुधीरां प्रश्न करावा कोठें आरंभून ?

## :: २९ ::

“ उशीर झाला सुधीर मज का ? होतां वाट पहात ? ”
“ छे छे चाळित होतों नुसते जुने वाचले ग्रंथ

सकाळपासुन असे ठरविलें परीक्षेस बसण्याचें
बी. ए. झाल्यावांचुनि नाहीं कांहीं वाचायाचें

अतां एकला नाहीं, मजला माणुस आलें आहे
निदान तीतें दो वेळेला खाउं घालणें आहे ”

“ नका एवढी वाटूं देऊं माझी जबाबदारी
बाबांनीं ती सोय करूनी असे ठेविली सारी ”

“ वडिलांनीं जें ठेवियलेलें तुझें असे तें खास
खर्चावें तूं गरिबांकरितां येइल जसें मनास

पसंत तुजला पडेल तैसें मीं तुजला रक्षावें
आणिक तुझिया सुखीं कधीं ना उणें पडूनी द्यावें

हा मी अपुला धर्म समजतों जर तो मान्य तुलाही
ना तरि सांगें पसंत जें तुज करिन मान्य मी तेंही ”

“ वदेन जें जें मान्य तुम्हांला होइल सांगा कैसें ? ”
“ झालें जरि ना, दुखविन तुज ना खास समज हें ऐसें

लग्नानें ना आणायाचें तुझिया सौख्यीं विघ्न
तुझ्या सुखानें कधीं न होतिल माझ्या आशा भग्न ”

“ पहा बरें हें काय वदतसां ? करीन कांहीं भलतें
आणिक पश्चात्तापें राहिल वच हें मागुन सलतें

नाहीं ? मग मी तुम्हां विचारूं ? रागवाल ना मुळिंही ?
ओढुन घेतें दार सांगण्या लाज वाटते बाई !

चित्रकार मज एक विनवितो चित्र करायासाठीं
चित्रमंदिरीं नग्न राहण्या कांहीं तासांसाठीं

मान्य तुम्हां हें ? " " तुला असें का मान्य बोल तें आधीं ?
मला न वाटे गोष्ट एवढी दिसते तितुकी साधी

नको मनामधिं आणूं तुजला मत्ता माझी गणितों
तुझ्याच सौख्यासाठीं का तव जीव एवढा धजतो ? "

" चित्रकार तो मित्र असे मम, कलाहि त्याची ख्यात
संकटांत तो, नसे तयाला नमुना सुंदर मिळत

त्याला, त्याच्या चित्रकलेला, मायभूमिला वरतीं
आणायातें उत्सुक आहें तशि देण्यातें स्फूर्ती "

" मित्र लेखिसी, ऋणी परी ना त्याची वित्तें लवही ? "
" नाहीं ! " " दुर्जन उपकारानें घेरिति अजाण कांहीं !

तुला न ठावी सौंदर्याची उन्मादकता प्रबला
पुरुषाची तशि चंचलवृत्ती म्हणुन सांगतों तुजला

सिंहाच्या जबड्यांत जाणुनी ठेवित असती मान
समज उचलिसी काळसर्प हा वदले कुणि जरि छान

अनुभविल्याविण मना गमेना ज्ञान जाहलें पूर्त
परि सत्याची किती भयंकर असते बघण्या मूर्त

मोलाविण का तोलाचा कधिं माल कुणाला मिळतो
कलाविलासापायीं कुणि कुणि आत्मविनाशा वरितो "

" कळतें नच का मला एवढें ? " " ठीक सुखी हो तेणें
तुझ्या सुखास्तव आहे माझें आतां सारें जगणें "

" पाठवीन मी परवां माझें सामान असे भारी "
" ठीक आण, ही जागा आहे तुझीच आतां सारी "

“ किती गोड तुम्हि सुधीर आहां खरे गोड गोड
उदार दुसरा कोण वदा जन पुरविल असले कोड ? ”

प्रेमाचा विजयध्वज रोवुनि नीट तयाच्या गालीं
म्हणे, “ अतां मी जातें आधिंच वेळ होउनी गेली ”

: : ३० : :

येते कशी ही अजुनी नाहीं ? येइन सायंकाळीं
असें म्हणाली कीं झाला तो भास मला त्या काळीं ?

येरझार करि चित्रा पाही चकोर निरखूनीयां
खरेंच होइल भव्य चित्र हें सुधा मिळाली जर या

मध्येंच पाही उभी अप्सरा कशी राहिली असती
केश झाडितां दिसेल कैशी तिची आकृती लवती

द्वारावरतीं तोंच ऐकुं ये टिकटिक थोडी झाली
म्हणे खास ही सुधा सांगण्या निश्चय अपुला आली

वदेल तरि ती काय म्हणोनी आतुर होई हृदय
आशाकिरणांचा तों झाला द्वार उघडतां उदय

“ दो दिवसांमधिं पुरें कराया हवें तुम्हांला चित्र
राहीन उभी तुमच्यासाठीं, नुमजा भलतें मात्र ”

आनंदाच्या लहरि उसळल्या चकोरवदनावरतीं
सुधाचंद्र पाहून तयाच्या हृदया आली भरती

“ मला न माहित कसें राहणें उभें भाव दावून
परी दावितां करीन माझी शिकस्त माझ्याकडुन ”

“ बरें, उद्यां मग आठाला या, जा अकराला परत
पुन्हां तिहींला या मग ना कुणि इथें सहाला ठरत ”

धीटपणानें घरा परतली करी विचार फिरून
द्यायाची ना लज्जा अपुली या कार्यीं होमून ?

आपण वदलों वित्तानें ना मिंधे त्या मित्राचे
सुधिरांजवळी खोटें बोलुनि एकच गेलों वाचे

परंतु इतुकी भीती त्याची कसली वाटे त्यांना
चुकी सावरुनि घेऊं अपुली ओघ कधीं येतांना

विचारांत ती चूर होउनी गेली पुष्कळ वेळां
खरेंच होता विचित्र अनुभव घेण्याचा ठरवीला

चकोर रात्रीं पाही स्वप्नीं उत्तम अपुलें ठरलें
चित्र कलाभिज्ञांनीं अतिशय गौरवुनी वानियलें

सुधाहि तेणें आनंदूनी आपण होउन आली
माला घालाया कंठीं तों —स्वारी जागी झाली !

दचकुन पाही भंवतीं, म्हणतो ‘ स्वप्नीं का मी चूर ? ’
निमिषामध्यें कळूनि ये कीं अजून सिमला दूर !

प्रभात होतां ठेवी गुरखा दारा राखायातें
कपाटमांडण करी अडोसा थोडा साधायातें

अजुनी वाटे तया एकदां मन का ती बदलील ?
म्हणे दुज्या क्षणिं आशि न पाहिली मुलगी दुसरी सरळ

तोंच सुधा ये, म्हणे “ अतांना कामा लागायाचें ? ”
दार लावितां वदे, “ तुम्हीं हें काम करुन घ्यायाचें ! ”

“ तिथें अडोसा, कपडे ठेवा नीट काढुनी अपुले
डाव्या खांद्यावरी केश द्या टाकुन रुळले सगळे ”

अपारदर्शक खिडक्या लावुनि उजेड बेताचाही
करुनी, ठेवी रंग नि कलमें, तेलें सन्निध घेई

मेजावरती टाकुनि ठेवी सतरंजीचें पान
जुळणी तर झालीसे वदतो कामाची या छान

आजवरीचे नमुने कोठें कुठें सुधालावण्य
उत्सुक होतें मन झालेलें म्हणे मनीं मी धन्य

होइल ना परि पुरें हातुनी गुंगविणारें चित्र ?
चला बघूं या पुरुषाचें ना भाग्य अतीव विचित्र ?

" तयार आहें, पुढें येउं मी ? " " या " म्हणतां ती आली
केवळ लावण्याची होती मूर्ती ओतियलेली !

:: ३१ ::

" समजा, आतां रंभा होउन शुक्रास मोहायातें
आलां तुम्ही तपापासुनी मुनीस चळवायातें

रिपुला चंचल करण्यासाठीं सौंदर्याचें अस्त्र
तुम्हां टाकणें त्याच्यावरतीं दिसतां म्हणुन विवस्त्र

हाव कोणता खेंचुन घेइल अचूक मानस त्याचें
मनांत आणुन तुम्हींच आतां शोधुन काढायाचें

करें झाडितां केश तुम्हांला आहे चोरुन बघणें
मुनी वेधिला आहे कीं तो अजुनी विंधित करणें

उन्मादकता कशाकशानें येत असे पुरुषास
हेंही ध्यानीं हवें घ्यावया वेरायास मुनीस

उघडें दिसतां चिर लपलेलें पाहुनियां नरचित्त
सुखावतें नी बघतें आणिक छपलें कांहीं उरत

झांकुन जावा एक बाहुनें, उघडा दुजा उरोज
केश झाडितां म्हणुन दिसावा मुनिनयनांतें सहज

लज्जामंदिर बघतो कीं ना न्याहळून घेऊन
भ्रूभंगें विव्हल करणारी हवी कराया खूण "

उभी रहाया यत्न करी ती विनम्र राही फार
" गर्विष्ठा ती रंभा, राहूं नका अशा हळुवार "

तरी पुरेशी उन्नत हो ना म्हणुनी स्पर्श करून
म्हणे, " अशा व्हा ताठ आपुलें शरीर लव उचलून "

स्पर्श शरीरा होतां गेली संकोचुनि पहिल्यानें
वीजहि तेव्हां गेली त्याच्या अंगांतुनि वेगानें

" मेजावरतीं मी हा बसतों शुकासारखा थेट
पाहिल कैसें केश झाडितां आणा ध्यानीं नीट "

तिला न येई त्याच्यावरतीं दृष्टी रोखायास
गभीर केव्हां, कष्टी केव्हां, कधीं दिसे सायास

" नसे साधली, दृष्टि पाहिजे अजून लाडिक हंसरी
रंभेलाही मुनि मोहाया युक्ति न दिसली दुसरी "

उभा राहुनी मागें, वळवी सर्व शरीर जरा तें
नितंबकांती खळया पुष्टता बघुनी विस्मित मन तें

पुढें तियेच्या हो गुडघ्यावरि, चरणीं येण्या बांका
मांसल मांड्या जरा दाबुनी म्हणे, " जराशा वांका "

रतिसदनातें पाहुनि अद्भुत मनिं जरि हो उल्हास
कलाचतुर तो वदनावरतीं होउं न देई भास

“ बरें रहा ह्या अशाच, खालीं नका हनुवटी घेऊं
थांबा उचलुन देतों थोडी नका लाजुनी जाऊं ”

पुन्हां स्पर्श हो, संकोच गमे यत्न तरीहि करी ती
म्हणे, “ अतां मीं रंगविण्यातें कलम घेतलें हातीं

हवी यावया अंगाची ही फेक अशी रेखीव
स्नायूंचा हा झोंक एकदम चित्र करीत सजीव

पेलव अवयव अस्फुट हिरव्या धमन्या त्यांच्यावरती
अंगकांतिवर अगदीं अद्‌भुत सुषमा वाढवितातो ”

दमून जाई घटिकेमाजी, म्हणे, “ विसांवा लव घ्या
येतिल दावायातें हळुहळु तुम्हां भावना अवघ्या ”

पुन्हां वस्त्र घे गुंडाळुनि ती स्वस्थ बसे आराम
ऐकियलें नव्हतें कीं असल्या कष्टांचें हें काम

जरा थकावें परी उठे ती कला कराया धन्य
चकोरही तो गेला गुंतुनि चित्रा करण्या रम्य

अशी संपली सकाळ आणिक दुपारही ओसरली
सायंकाळीं सुधा खरोखर कष्टें मेली झाली

## :: ३२ ::

प्रभावशाली पुरा स्वयंप्रभ चकोर जरि तो होता
रंग सुधेच्या अंगकांतिचा त्यालाही दे गोता

मऊ स्निग्धतेचें जें मीलन छटाछटांनीं होतें
काय करूं हें पूर्णपणें ना चित्रामध्यें येतें !

असें जरि म्हणे तरी सकाळीं चित्र पुरें तें झालें
बारिकसारिक काम कुठेंतरि होतें राहुनि गेलें

" सायंकाळीं सरतिल सारे " म्हणे " घेतले कष्ट
हवें सांगण्या मतास तुमच्या चित्र पाहुनी स्पष्ट "

घरीं परतली जेवण होतां बांधी सामानास
दोन शतांच्या नोटा ठेवी चकोरास देण्यास

सामानातें धाडी लिहुनी सुधीरास त्या पत्रीं
' सायंकाळीं आलें तर मी येइन सातांपुढतीं '

चकोर होता बघत आपुलें तयार झालें चित्र
त्यास कळेना परी सुधेचें वर्तन आणि चरित्र

इतकी धीट कशानें बनली ? हिचें प्रेम का आहे ?
सुंदरशा मज जिंकाया का उपाय ही करिताहे ?

पैसे चुकवुनि निरोप घेउनि माईचा ती आली
चकोरवृत्ती निमिषामध्यें झाली मोहरलेली

पुन्हां सुरू हो काम सहाला कलम करींचें टाकी
" येइल करितां नमुन्याविणही " वदे " अतां जें बाकी "

म्हणे मनीं कीं पुरतें होइल चित्र परी ही मूर्त
पाहण्यास का पुन्हां कधिं अशी मिळेल जन्मीं येथ

म्हणुनि सुधेच्या उगाच मागें आणि पुढें राहून
अनिमिष नयनीं पाहत राही लावण्या निरखून

हनुवटि अवनत, शरीर उन्नत, हातीं स्पर्श करून
चित्राकरितां करी परी तें मानस जात चळून

एका करिं ही सीमा आली सुंदर चित्रकलेची
दुज्या करीं ही कां न असावी सुंदर काय सुधेची ?

असें वाटतां म्हणे सुधेला स्कंधीं कर ठेवून
“ लाज कशाची? अतां सांग हें पटे चित्र का पूर्ण ?”

“ तुम्हांस पटलें तर सार्थकता झाली आयासांची ! ”
चकोर बोले “ उणीव उरली एक यांत केव्हांची

उभी राहिलिस चित्रासाठीं हृदय उदार करून
धन्य न कां मज करिसी आतां माझी तूं होऊन ”

कानांमध्यें काय तापलें ओतियलें तिज न कळे
धरणी खालीं बुडत चालली तिज गमलें त्या वेळे !

कर धरितांक्षणिं थरथर कांपे भयाभीतही झाली
म्हणे, “ कशी हो चकोर तुमची वृत्ति आज ही चळली? ”

“ वृत्ति कुणाची चळली ? डोळे नीट आपुले उघडीं
चळल्याविण का झालिस तूं ही माझ्यापुढतीं उघडी? ”

“ मित्रासाठीं हिंद्भूमिच्या कलावैभवासाठीं
लोकविलक्षण मीं पतकरली आयासांची आटी

चकोर, सरलें काम अतां ना?” “ कोण वदे झालें तें ?
अनुग्रहाविण नुसतें दर्शन भक्ताला का पुरतें ? ”

“ सुधीर ! तुमचें नायकिलें मीं ” “ माकड का तें गोड
तुला वाटतें ? ” “ नष्टा ! दुष्टा ! चांडाळा ! कर सोड ! ”

हांसडुनी कर धावे थरथर इतस्ततः खोलींत
झणिं कलमांचा उंचट पेला आत्मरक्षणा घेत

म्हणे, “ दूर हो मेल्या ! ना तरि मृत्यू येइल यानें ”
आणि फेंकिला अंगावरतीं ताडादिशीं त्वेषानें

वांचुन गेला ! चित्र फाटलें ! नयनीं धुंदी चढली
हाय ! मूर्च्छिता परि मूर्खानें कलिका ती कुसकरिली !

## :: ३३ ::

सोसाट्याचा वारा वाहत होता आकाशांत
अकांडतांडव चालू तेणें मेघांचेंही होत

दरियावरची लाट आपटे धक्क्यावर जोरानें
असावधां ती अचानक करी सावध शिंपडण्यानें

झाडें नारळि घुसळुनि निघती भीषण त्या झोतानें
मध्येंच हलती खालींवरतीं सळसळ फांद्या पानें

केर गवत नी पानें कपटे कागद् नी पाचोळा
भिरभिर वाऱ्यावरी तरंगे वा कोठें हो गोळा

डोळयांमध्यें धूळ उडोनी कोणी झाले स्तिमित
म्हणती आज वसंतारंभीं वादळ कोठुनि येत

खिडक्या दारें आपटताती दाणदिशीं जोरांत
कांचा सुटुनी खळकन फुटुनी खालीं कोसळतात

टपाटपा तों थेंब लागले जोराचेंहि पडाया
छत्राविण असल्यांची धांदल काय पुसा त्या समया

वीज कडाडे मधींच तडके आकाशाचें भिंग
मनुजा कांपविण्या का सृष्टी तयार बांधुनि चंग ?

क्षणांत आली सर जोराची वाहुं लागलें पाणी
जो तो गांठी अंधाराच्या आधिं आसरा पळुनी

वादळ होतें असें सुरू तों शुद्धीवर येऊन
बघूं लागली सुधा स्वतांला कोठें आहों पडुन

क्षणांत आठव होउनि लागे डोळ्यांलागीं धार
समदुःखी सृष्टी जणुं ढाळी आंसवांस अनिवार

झांकुनि घेई अंग बघे ती कोण असे भंवतीं तें
नराधमाविण अंधारामधिं दुसरें कोणी नव्हतें

बसला होता कोपऱ्यांतल्या एका खुर्चीवरतीं
खालीं पडलेलें अपुलें मुख उचलीना तो वरतीं

ध्यानीं आलें निमिषामध्यें दुष्टाचें तों कृत्य
क्रोधद्वेषत्वेष अनावर हो पाहुनि तो दैत्य

कशितरि नेसे केश आवरी झपाझपां वेळेला
नरकाहूनी निंद्य गमे तें स्थळ तिचिया चित्ताला

अंगाची रागानें होती लाही लाही झाली
भयकर चढुनी गेली होती डोळ्यांवरतीं लाली

तडातडा ती बूट वाजवित त्याच्यापाशीं येई
" नीचा ! हे घे तुझे दोनशें " भिरकावुनि ते देई

धाडदिशीं दे दार उघडुनी, गुरखा दचके खालीं
तुडवित होती जात तेथुनी क्रूरा क्रुद्धा काली

कोण तियेला अडविल आणिक तीही अडते कोठें
फिरली चर्या धजे न कोणी विचारण्यातें तीतें

तिरस्कार हृदिं सांठवलेला क्षुद्र पुरुषजातीचा
ओसंडत नयनांतुनि होता पेट घेउनी साचा

झिम् झिम् पाउस होता चालत वीजहि चमके मधुनी
भिजती वसनें बूट तरी ती चाले जग अवगणुनी

मनांत आल्या क्षणांत गांठी स्टेशन दिसलें जवळ
गाडीमध्यें शिरली धरुनी करिं केशांचा कवळ

मध्येंच सोडी केश मोकळे अंगावरतीं पुढतीं
झांकुन जातां क्रुद्धवदन तें कुणी न बघण्या धजती

उगा चौकशी कोण करितसे जो तो कामीं चूर
पाही, विसरे, चिंता अपुली प्रत्येका भरपूर

लोकल गांठी शेवटच्या त्या विश्रामस्थानातें
अंधारामधिं सुधा उतरली भय तिज उरलें नव्हतें

## :: ३४ ::

कुठें चाललिस सुधे, तुला का माहित तरि हें आहे ?
विचारण्यातरि ऐसें तिजला येथ कोण जन राहे ?

खांचा खळगे शेतें माती चिखल कुठें झालेला
तुडवित आहे दूर चालली ठावें नच कोणाला

मधींच भुंके कुत्रा कोठें लागुनियां चाहूल
इतरां होती पडत चालली निद्रेचीही भूल

बूट लागुनी लंगडण्यातें लागे मधुनी मधुनी
वस्त्रामध्यें होते लोंबत शिरले कांटे कुठुनी

परी तियेला भानच नव्हतें चित्ताचें शरिराचें
म्हणुनी ऐशी सैरावैरा चालतसे केव्हांचें

मार्गीं पडली धोंड लागली, भळभळ डोक्यांतून
वाहुं लागलें रक्त, निघाली रक्तानें नाहून

भिरभिर वारा मात्र पहारा होता भंवतीं करित
देह हळुहळु जाय थकोनी तरि ती तैशी उठत

लांब दिसे तों दिवा बारका मिणमिणता अंधारीं
रोखानें त्या चालुं लागली येतां अल्प हुषारी

कशीतरी पोंचली दिव्याच्या जवळजवळ जाऊन
हाय तोंच ये भोवळ तिजला ठेंच तिथें लागून

धाडदिशीं आवाज ऐकिला कसला काय म्हणोनी
कवाड उघडुनि आली कोणी दीप तिथें घेवोनी

म्हातारी दचकली, म्हणे कुणिं आणियली ही पोर
आणि टाकिली लपवायातें अपराधा घनघोर

असो कसेंही जरूर आधीं हवें हिला रक्षाया
जाउनि आणी बोलावुनि झणिं होत्या नोकर बाया

तिलाहि तेव्हां रडुं कोसळलें बघुनि कोवळी मूल
कोण खरोखर अधमाधम हा करी कळीस मलूल ?

वदनावरतीं पाणि टाकिलें थापटिलें थोपटिलें
रक्तानें तों हात भरोनी आले सगळे दिसले

अळेंबळें मग मुखांत घाली चमचाचमचा पाणी
हळूहळू तिज येउं लागली शुद्धी उपचारांनीं

हळू आणुनी ठेवी अपुल्या मऊ मंचकावरतीं
केश करोनी दूर पाहतां अश्रू तिज नावरती

म्हणे निर्मितो देव कशास्तव रूपवान या महिला
वृकोदरांच्या पुढतीं टिकतिल कैशातरि या अबला ?

वस्त्रें दुसरीं नीट नेसवी झणिं त्या बायांकडुन
बांधवि जखमा औषध लावुनि नीटपणें पाहून

हळू हळू ती डोळे उघडी लाल जाहले बुंद
अजुनी नव्हती ओसरलेली डोळ्यांवरची धुंद

थोडें थोडें ऊन दूध ती घालवि बायांकडुनी
तिला कळेना आपण आलों कैसे कोठें कुठुनी

देवी म्हणती, “ डोळे मिटुनी स्वस्थ निजा तुम्हि शांत
समजा दुसरीकडे नसोनी आहां नीट घरांत ”

इकडे तिकडे बघे परी ती घाबरून नयनांनीं
ऐकुनि शब्दां येउं लागलें डोळ्यांमध्यें पाणी

“ मी आहें हां जवळ, तुम्हांला भीति नसे कोणाची
ऐकणारना माझें आतां ? स्वस्थ झोंप घ्यायाची ”

बायांना ती म्हणे, “ अतां जा साऱ्या गेलां दमुन
म्हातारीला मला झोंप ना जागत मी राहीन ”

मनीं म्हणे परि कैशी आली माझ्या दारीं बाळ
विरुद्ध ऐसा होत कशानें जीवावर या काळ !

## : : ३५ : :

सुधा उतरतां जिन्यांतुनी तो चकोर लावी द्वार
खिडकी उघडी दीप न लावी म्हणे बरा अंधार

वदे करावें काय अतां हें मन का होइल वेडें
कसें न आलें वेळीं मातें मन आवरण्या थोडें

उगाच दिधला मान माझिया चित्रकारमित्रास
आणि झोंकली चित्रामधिं या स्वैरपणा येण्यास

खरेंच इतका कसा बहकलों कधीं न झालों विवश
वेळच भरली म्हणून झालों तयार दुष्कृत्यास

मला कधीं ना पूर्वी होती अशी कल्पना शिवली
घडलें ऐकुनि मानिल का कुणि माझी सत्या बोली ?

होउन गेलें हातुन आतां —हाय काय मीं केलें ?
परिमार्जन तरि अपराधाचें असल्या होइल कुठलें ?

अशी चालली विचारावली तोंच वाजलें कांहीं
उडत चालल्या होत्या नोटा जलद दिशांना दाही

दिवा लावुनी वदे, " उचलितों कपटे विखरुनि पडले
सांधिल का कुणि शीलाचे परि माझ्या तुकडे झाले ? "

दिवा घेउनी निहाळितो तें चित्र फाटुनी गेलें
शील संपलें चित्र फाटलें, काय हातुनी झालें ?

कांहीं न सुचे विचार सोडिति पाठ मुळीं ना त्याची
भीति तयाला वाटुं लागली पुढच्या भवितव्याची

निरोप देई गुरख्यालागीं पुन्हां बाटली काढी
म्हणे अतां ना उपयोगी ही घेणें थोडी थोडी

धुंदी लौकर चढली झाला मोहामाजी मुग्ध
निपचित होउनि पडला शयनीं सकाळवेरी स्तब्ध

वाट सुधेची किती पाहिली सुधिरानें त्या दिवशीं
म्हणे कुठेंतरि राहुनि गेली भ्याली पर्जन्यासी

कसेंतरी मग घेई खाउनि गार निवालें अन्न
दोघां जेवायाचा योग न म्हणुनि मनीं हो खिन्न

इतुक्यांतच का अशी काळजी वदुनी दावी हास
हंसला, प्रेमाचे परि कधिं का सुटतिल नाजुक पाश ?

आलें तर मी येइन ऐसें लिहिलें आहे येथें
उगाच इतका वेळ दवडिला, कारण आहे कोठें ?

वेळीं येइल, अतां कशाला विचार याचा येथ
म्हणुनि मालवी दीप, पडोनी राहे अंधारांत

चित्त परी तें होई अस्थिर सुचे न कांहीं केल्या
डोळा लव लागेना त्याचा विंशति घटि जरि झाल्या

मनांत आले तरंग कैशी ओळख अपुली झाली
कसे जुहूच्या किनाऱ्यावरी फिरलों सायंकाळीं

अंधारामधिं कशी बिलगली हाता घट्ट धरून
कशी विजेची लहर थरकली तेव्हां अंगांतून

कशी मोहनी घालायाचा आपण यत्न न केला
सुदैव म्हणुनी तिचिया चित्तें मार्ग कसा हा धरिला

वडील जातां कशी इथें ती घाबरुनीयां आली
अश्रूंनीं भिजलेली कैशी दिसली अपणा वेली

कसा काढिला भांग ? कशी ती हट्ट घेउनी बसली
प्रेमाची मग भाष थांबली कशि चिन्हानें गालीं

अशा तरंगीं किती रंगला पुन्हां आठवी सारें
कितीदां तरी प्रेमी ऐसे रंगुनि जाती सारे

निद्रेनें परि घेरियलें त्या याहि विचारीं थकतां
अशी मोहनी पडते थकल्या चिंताग्रस्ता जगता

## :: ३६ ::

प्रभात होतां उठूं बघे ती सुधा मंचकावरतीं
तिला न उठवे सारीं गात्रें ठणकत होतीं नुसतीं

आठव होतां क्रुद्ध निखारे डोळयांतुनि सांडावे
कोणापाशीं अवाक्षरहि ना तिचियानें परि यावें

तळमळ तळमळ करित राहि ती पडल्या पडल्या तेथें
सूड उगवणें तरि कोणावर ? होती कुठल्या कोठें

द्वेष गमावा तिचा तिला कधिं, कधीं द्वेष इतरांचा
मुठी वळोनी राही परि ना वदवे कांहीं वाचा

कधिं मुद्रेवर तिरस्कार ये पुरुषजातिचा अखिल
सुधीरमूर्ती आठवितां ये नयनांतूनी सलिल

पडून राहे शब्द न बोले कोणाशींही कांहीं
तापानें येउनि अंगाची त्यांतच केली लाही

काया मृदुला किती, केवढा ताण तीवरी पडला
शरीर मानस दोहोंचाही सांचा दुखुनी गेला

देवी परि किति तत्पर होत्या तिचिया शुश्रूषेंत
अपुली कन्या समजुनि त्यांनीं वागावें मायेंत

डोईमधली जखम बांधणें केसांना विंचरणें
कपडे देणें, खाणें त्यांनीं स्वतः ठरविलें करणें

सदा मुखावर हास्य दिसावें सुखासमाधानाचें
प्रसन्न त्यांचें वदन ओढुनी घेई मन अन्यांचें

पाउल त्यांचें कधीं चुकोनी पडे न तें जोरानें
मोडित ना त्या लवहि एवढें चित्त कधीं शब्दानें

स्वतां करावें अंग मोडुनी साऱ्या परिचिर्येस
मलिनपणा नी घाई यांचा न दिसे कधिं लवलेश

करांतुनी वा नजरेंतूनी सदा वहावी ममता
बोलायाच्या आधीं ध्यानीं येई त्यांची मृदुता

रडूं लागतां पाठीवरतीं हळूच गोंजारावें
चुकून परि ना प्रश्न तियेच्या गताविशीं काढावे

मेजावरतीं फुलें आणुनी ठेवावीं फुलणारीं
उदबत्तीही द्यावी लावुनि गंधें दरवळणारी

जिकडे तिकडे दिसे स्वच्छता जागरूकता प्रियता
बरें लागलें वाटूं तिज दिन ऐसे कांहीं जातां

अजूनि मन ना उत्सुक होतें लवभर जाणायातें
कुठें असों कीं करी कोण हें अपुल्या परिचर्येतें
तोंडामधुनी शब्द न काढी स्वस्थ पडूनी राही
तिला सुचेना काय करावें बोलावें वा कांहीं

कामें ठेवुनि देवी मधुनी हळूच येउनि जाती
पाहति झोंपुनि गेली वा ती जागी पडुनी नुसती

बरी चांगली होतां डोळां वाहूं लागे धार
नावरतां ये कांहीं केल्या अश्रूंना अनिवार

कधीं दाबुनी ओठां फेऱ्या घाली ती खोलींत
द्वेषानें कधिं रुष्ट दिसोनी क्रुद्ध बनोनी जात

तरी चुकोनी तिजला पुसला देवींनीं ना शब्द
वदती कधिंतरि वदेल आपण बाला लज्जामुग्ध

कुरवाळावें मुख ममतेनें केसां नीट करावें
कधीं रुमालें अश्रू टिपुनी नयनांतिल ते घ्यावे

कधीं तियेला न्यावें थोडें अंधारीं फिरण्यास
आशा ही कीं वाटो तिचिया चित्ताला उल्हास

प्रेम काय हें, ममता किंवा परिचर्या तरि काय !
कितिदां वाटे सुधामना परि शब्द न वदवे हाय !

## : : ३७ : :

एके दिनिं परि मातेसम त्यां सुधा जाउनी बिलगे
अश्रु न ये तिज आवरण्यातें नयनीं ये जो वेगें

म्हणे, “ तुम्हीं कां रक्षियलें मज ? टाकुन कां नच दिधली ?
माझ्या जिणियाची आहे हो राखरांगुळी झाली

तोंड मला ना दाखविण्याचें कुणासही हें आतां
तुम्ही तरी द्या आणुन मातें जहर पिण्यातें मिळतां

मींच आणिला माझ्यावरतीं प्रसंग हा ओढून
मीच माझिया देतें देहा आग अतां लावून

सांगा तुमची परी कशी मी होऊं ही उतराई
माझ्याजवळी आतां नाहीं एकहि ती शिवराई ”

गद्गद होई शब्द फुटेना थरथर तनु ती हाले
शब्द ऐकुनी देवींचेही डोळे भरुनी आले

देवी वदल्या, “ थांबशील का रडावयाची आतां ? ”
चिंब होउनी गेला होता पदर तियेचा नुसता

“ तुला कुणी का वदलें येथें उतराई होण्यास ?
शब्द कुणाचा काय लागला तुझिया मृदुल मनास ?

अशी कल्पना मनामधीं तरि तुझिया यावी कां ती ?
भाग्याविण ना कधीं कुणाच्या पडती भेटी गांठी

नशिबानें तूं आलिस माझ्या दारापुढतीं ऐशी
आजच योगाची अद्भुतता ध्यानीं येइल कैशी ?

स्वस्थ रहा तूं ! शांतचित्त हो होइल सारें नीट
सोडावी ना कधीं सदाशा, जातिल दिन वाईट

ऐकणार ना माझें ? सोडूं नको मनींचा धीर ”
ऐकतांच ते शब्द लागलें वाहूं नयनीं नीर

धीर मनींचा सुधीर मातें अतां कोठुनी भेटे
आणि तयाला दावुं तरि कसें वदन तियेला वाटे

पुन्हां थरथरा कांपुं लागली रडूं लागली फार
देवींनाही मुळीं कळेना दुःख काय अनिवार

देवी वदती, “ ऐकशील का चित्ता घट्ट करून ?
गिळुनि एकदम टाक अश्रु, जग बघ डोळे उघडून

बाळ, न अपुलें दुःख एवढें, जगतीं कितितरि दुःख
‘ विपन्नाश्रमा ’ बघतां कळुनी येइल झाली चूक

केवळ अपुल्यावरतीं नाहीं रोष जगीं दैवाचा
निष्ठुर बघ हा प्रहार कितितरि इतरांवरही साचा !

जन्मापासुन पंगु यांतले पहा इथें दिसतात
हात न कोणा, पाय न कोणा, कुणा न वदण्या येत

बहिरे कोणी, कोणी असती अंध एक डोळ्यानें
धडक जगाशीं कैशी घ्यावी असल्या वैगुण्यानें ?

शिकवित आहें परी अशांना आशा बाळगिण्यास
आणिक अपुल्या पोटासाठीं करण्या उद्योगास

मुलि मुलगे नी बाप्ये बाया सर्व गुंतुनी ठेलीं
अपुलीं कामें करण्यामधिं तीं चूर होउनी गेलीं

हात पाय वा डोळा एकच असो करिति ते काम
घाम गाळिती आणि मिळविती पोटापुरते दाम

भीक मागणें पाप ईश्वराघरचें आहे ऐका
विपन्नाश्रमीं माझ्या शिकती सारीं मंत्रा एका

दुःख गिळावें धीटपणानें इतरां दुःखी बघुन
दयानंदजी गेले शिष्यां पुनः पुन्हां सांगून

गमलें तरि तुज काम यांतलें हवें तुला तें घेई
मुलीपरी तूं, होणें नलगे माझें तुज उतराई ”

## :: ३८ ::

‘ हातुन झालें काय ’ चकोरा चित्त वदे टोंचूनी
पाठविणें परि आज तयातें पुरतें चित्र करूनी

सुइदोरा घेऊन शिवाया लागे जपुनी वस्त्र
‘ हातुन झालें काय ’ असें मन फेकी त्यावर अस्त्र

मागें कापड लावी, बुजवी रंगीं झाली खूण
मानेचाही पुरा पीळ तो उरला घेइ करून

ध्यानिं पुरा तो बसला होता म्हणुनी नाहीं पूर्ण
केला आधीं, आज परी तो हातीं घेई तूर्ण

दिसतां रंभा हात थरथरे भास सुधेचा होई
मानेचा तो पीळ नाठवे, घाबरुनी मनिं जाई

म्हणे असें कां होई मजसी ? कसें सुचत ना नीट ?
स्नायूंची ही फेक गळयाची ध्यानिं न कैशी उरत ?

उशीर होऊं बघे संपवी शिकस्त अपुली करुनी
चौकट बसवुनि बंद करुनि घे चित्रा नेट धरूनी

सायंकाळीं करावेगळें काम परी तें होतां
जिवा टोंचणी आंतुन लागे कांहीं न सुचे चित्ता

सिगरेटहि शिलगावी संतत तिला न आतां खंड
एकाजागीं मुळीं न बसवे, कुठें न वाटे थंड

कधिं वाटावें अंग आपुलें सारें पेटुनि गेलें
कधीं हिमापरि गार गमावें बधिर होउनी ठेलें

दूर बोलक्या चित्रपटांना जाउनि बैसे केव्हां
रमे न मन तें, चालूं लागे गमे मनाला तेव्हां

वाऱ्यावरि पाचोळा उडतो बसतो केव्हां कोठें
तशी होउनी स्थिती मनाची स्थिरता न कुठें वाटे

‘ हातुन झालें काय ’ पालुपद चित्त सारखें घोकी
टोंचणि थांबविण्यातें पेला मद्याचाही झोंकी

सुधीर चळला नाहीं चित्तीं अचल राहुनी गेला
मार्ग तयानें विचार करुनी अपुला निश्चित केला

म्हणे सुधा ही सुशिक्षित पुरी नव्या मनूंतिल बाला
स्वतंत्रता तिज पुरी देउं या, मार्ग धरूं दे वरिला

असेल कोठें कामास्तव ती बहुतकरूनी गेली
कामाची माहिती अजूनी नसेल तिजला झाली

पुरें काम तें होतां येइल यांत न कांहीं शंका
आपण नाहीं मनांत घेणें उगाच भीति कुशंका

मुली अतांच्या अशी चौकशी आवडेल वा नाहीं
केली त्यांतें, म्हणुनि आपला स्वस्थपणानें राही

प्रेम एकदां सांगे त्यातें तपास करणें हाही
कर्तव्याचा मार्ग असे, तूं तसें करित कां नाहीं ?

म्हणे दुज्यांना इतकें हतबल आपण कसें गणावें
शांत राहुनी होइल जें जें आपण पाहुनि घ्यावें

आंखियलेला अभ्यासाचा मार्ग वरी तो धीट
विवेक करुनी उद्योगातें लागे अविचल नीट

सुधीर जरि तो सुधीर होता तरि कधिं होउनि विचल
म्हणे मार्ग मी योग्य वरित ना ? असें जात ना सरळ ?

प्रेमानें मन भरुनी केव्हां स्वतःस दोषी गणि तो
दुज्या क्षणीं मन म्हणे जीव हा बरा न अस्थिर होतो

जीवन शिकण्याची जीवांची जीवित आहे शाळा
अतां कशाला चिंता करणें शिकुं दे जीवन तिजला

असें म्हणोनी योजियलेलें पुढें वाचण्या लागे
काळ चालला पुढें, न पाही कोण राहिला मागें

## :: ३९ ::

सुधेस येउन जों न लोटले मास दोन त्या जागीं
हळूहळू ती पाहुं लागली कामें अपुल्याजोगीं

देवींना ती म्हणे, " इथें मी खोलींतच राहीन
लिहिण्याचें एकटिला जें होइल तें सारें पाहीन

मला न होइल धैर्य कुणाशीं कांहीं बोलायाचें
शरीरकष्टांचीं वा कामें राबूनी करण्याचें "

" होइल तुजला तेंच करीं तूं, रमेल जेथें चित्त
तेंच करावें, काम होतसे तेणें हातुन बहुत "

देवी देती टपाल वाचुनि भाग करी ती त्याचे
देवींचे वा असल्या चालू तेथिल उद्योगांचे

प्रवेश मिळण्यासाठीं कोणी तिथें माहिती मागे
कुणी विपन्नाश्रम बघण्याची इच्छा लिहुनी सांगे

कुणी पुसतसे खर्च किती ये आश्रम चालविण्यास,
शिकलेलीं कुणि मिळतिल का हे घेण्यातें आयास ?

कुणी अडचणी मांडी अपुल्या कुणी विचारी तिथल्या
गुंतागुंत किती प्रश्नांची कळलें कामीं असल्या

मना विसांवा वाटावा नी देवींनाहि जराशी
व्हावी अपुली मदत म्हणोनी करी खऱ्या यत्नांसी

वृत्तपत्र वाचतां एक दिन पास होय हें कळलें
परंतु बोलायास कुणाशीं जीभ मुळीं ना उचले

त्यांत न वाटे बरें तियेला काय होय तें न कळे
पडून राही शांत वाटलें अस्वस्थ जरी वेळे

होइल तितकें लिहून ठेवी उत्तरांस ती जपुन
देवींनाही बरें वाटलें काम करी हें बघुन

देवी तर सारख्या कशा ना कशांत रमल्या दिसती
उसंत न दिसे जिवा तयांच्या सर्वभरी त्या फिरती

स्वच्छपणा हा आश्रमांत तर त्यांना वाटे प्राण
म्हणुनि काळजी घेती, देती राहू न कुठें घाण

ताजें साधें स्वच्छ मिळावें खाण्यातें सर्वांना
सुचविति युक्ती सैंपाकामधिं तेथींच्या बायांना

लहान मोठ्या कुबड्या कोठें नीट करवुनी घेती
लांकडि चित्रें जोडुनि करितां मदत हवी ती देती

लहानग्यांना थोपटुनी त्या आनंदानें हंसती
देती उत्तेजन नी कौतुक उद्योगाचें करिती

शिवण्याचीं यंत्रें ना चालति नीट एक पायानें
कपडे शिवुनी नीट होतिना बघती त्या जातीनें

मुकेहि आनंदें शिकतीना उच्चारांस कराया
खुणाखुणांनीं शिकले शकती वाचुनि ना सांगाया

उशा नि अभ्रे कांठ नीट ना सुबकपणानें भरती
टाकिति बारिक लक्ष आपलें सगळ्या कामांवरतीं !

असे शंभरावेरी जमले जीव पहा खपताती
आनंदानें राहति म्हणती अम्हां न कांहीं कमती

मोकळेपणें वदती कोणी अडत तयां जें कांहीं
सुचवुनि देती मार्ग त्यांतला सोपा वाटत तोही

बघण्या येती तयांस देवी म्हणती, “ शांतपणानें
फिरा बघा नी कुणा न हलकें लेखा येश: मनानें ”

निरोप देतां शेवटिं वदती, “ अशा विपन्नांसाठीं
अपुल्या गांवीं सोय करा ही असे तुम्हांला विनती

आळस जाइल उद्योगाची होइल संवय अशानें
रोग थांबतिल, अब्रू राहिल भीक बंद झाल्यानें ”

: : ४० : :

सुधा परीक्षा पास जाहली कुठें तिला कळवावें
सुधिराचें मन म्हणुनि कधिंकधीं आतुर होउनि जावें

वाट पाहिली विद्यालयही उघडुनियां जरि गेलें
तरी तियेचें वृत्त नाकळे साचिंत मानस झालें

तातगृहीं का गेली अथवा आजारी का कोठें
कळवीलें ना मातें घर तें जेथें जाणें होतें

घरीं कुणी का चित्त तियेचें वळवीलें लग्नास
आणि म्हणोनी सुखी तियेनें केलें काय दुज्यास

सुधा न ऐशी वाटे चित्ता परी करिल तरि काय
जीवा देण्या नातलग जरी बसली घेउनि हाय

अजुनि मुलींना मोडवतें ना मोठ्यांच्या शब्दातें
तयार आहे कोण पाहण्या काय तयां वाटे तें ?

आपण दिधला शब्द तियेला आपण राहुं इमानी
वचनमुक्त परि करूं तियेला जरि ये संकटिं दिसुनी

समाज अपुला अजुनि वाढला आहे कोठें पुरता
म्हणुनि हनी पतकरिली आपण उदारता ना चिडतां

विवेक ऐसें बोलुनि जाई, हृदय न मानी बोल
प्रेमाचे किति गुंतुनि जाती धागे हृदयीं खोल !

कधीं हले मन तरी विवेकें सांवरुनी तो घेई
पुन्हां आपल्या वाचनामधीं गुंग होउनी जाई

परि विद्यालयिं खूप चालती गप्पा नानापरिच्या
गंभीर कधीं, कधीं टारगट, कधींकधीं गमतीच्या

‘ प्रेमाचा फटकारा ऐसा आहे भयकर जगतीं
झाली कैशी पहा तर गती पोराची या नुसती !

अरे ! सुधेनें केला दिसतो उरांत जहरी वार
म्हणुनि बिचारा कुठेंहि भडके दुःखानें अनिवार

सौदामिनिचा लोळ पडावा वृक्ष फाटुनी जाई
ऊर तयाचें तैसें दिसतें फुटलें प्रेमापायीं

अबला मुलुखाच्या या प्रबला फेकिति भेदक बाण
टाकिति कासावीस करोनी बघणाराचे प्राण '

अशी मुलांची भाषा चाले चकोरगोष्टी निघतां
सुचेल तें तें कुणी बोलती करिती भलत्या थट्टा

' हातावरतीं तुरी देउनी पोर पळाली तरि का
अजून बसला आहे तिचिया नांवें मारित हांका ?

पुरता पागल दिसतो पोरी कळल्या नाहिंत अजुनी
वागत असती केव्हांतरि का दिसती तैशा चुकुनी ?

असेल हुरळुनि गेला तीचे ऐकुनि गुलगुल शब्द
तिनें बांधिलें असेल दुसऱ्या संधानातें स्तब्ध

बसा म्हणावें खात चुरमुरे प्रेमीं होउन दंग
करित राहिली असेल तीही दुजियासंगें रंग ! '

चकोर भिरभिर फिरे सारखा शब्द न बोले कोठें
आशा एकच, बघणें कीर्तीतरि का अपणां मिळते

मनांत त्याच्या येई जर का चित्र यशस्वी ठरलें
शकेल विसरूं चित्त आपुलें कर्म हातुनी झालें

' हातुन झालें काय ' घोळतें एकच वाक्य मनांत
निकाल ऐकायास जाहलें होतें आतुर चित्त

केसांची वा कपड्यांचीही मुळीं करीना परवा
आला दिन तो ढकली न गणी वाइट किंवा बरवा

हिंडत राही, सिगरेट सदा वदनामध्यें राहे
मद्याचाही पेला मधुनी मदत कराया आहे

## :: ४१ ::

पाउसकाळा सुरू जाहल्या झाले महिने तीन
नव्हतें राहियलें सृष्टीचें स्वरूप आतां दीन

अंवतींभंवतीं डबकीं भरलीं खळखळ वाहे पाणी
भातांचीं रोपेंही सुंदर डुलती अधुनीमधुनी

वृक्षांवरतीं तरारलेलें डोळां दिसतें पान
अनंत हिरव्या छटा तयांच्या मन करिती बेभान

बघाल तिकडे दिसे पसरलें हिरवें हिरवेंगार
गुरेंहि दिसती दंग जाहलीं खातां हिरवी चार

गरिबांचें मन दिसे निवालें पाउसपाणी बघुन
प्रसन्न मुद्रा त्यांची मोहवि मनास आनंदून

शेतामध्यें बेडुक गाती पर्जन्याचें सूक्त
तुष्ट देव तो जलधारा जणुं म्हणुनी ओतुनि देत

विपन्नाश्रमीं उद्योगाचें चक्र फिरतसे सतत
देवी असती दक्ष म्हणोनी सर्व असे सुरळीत

त्यांत तयांना अतां सुधेची मदत होतसे भारी
अंग मोडुनी लेखनकामें उरकितसे ती सारीं

परी तियेला उमगुनि आलें नुसतें इथें लपून
भागायाचें अतां पुरें ना जगा सोडल्यावीण

कांहिं पोटचें वरतीं खालीं करी तिचाही जीव
उपाय आतां एक दिसे कीं हवा द्यावया जीव

मुख लपवाया खोलीमधुनी पडे न ती बाहेर
देवींनाही बोलायाचा होई न तिला धीर

अविचारानें केलें साहस, वियोगशिक्षा साहूं
असें वाटुनी होती घोकित पुढचें पुढतीं पाहूं

परंतु कळतां निसर्गशिक्षा मनीं पोळुनी गेली
म्हणे अतां मज आशा कसली जगांत आहे उरली

कसें अरेरे ! हट्ट धरूनी नायकिलें सुधिरांचें
केलें मातेरें मीं माझ्या हातानें जन्माचें

तयां आणिलें प्रेममंदिरीं अळेंबळें खेंचूनी
आणि मंदिरा आग लाविली वेडें साहस करुनी

हातीं होतें सुंदर मोती त्याची माती केली
मेलीला दुर्बुद्धी कैशी विनाशकालीं झाली

सुधीर असतिल पहात माझी वाट चातकापरिस
तयां न ठावें सुधा किती ही जहरी जहगापरिस

काय करावें ? पेटवूनि का द्यावें या वसनास
किंवा देऊं अर्पण करुनी सागरांत देहास ?

चरचर अपुली मान घेउं का कापूनी शस्त्रानें
किंवा लोटुनि देऊं काया दरींत आनंदानें ?

मरणा ! आतां भीति न मातें तुझी मुळींही वाटे
तूंच अतां मम मित्र, लौकरी येइन तुझिया वाटे

अहा ! लौकरी सर्व यातना चित्ताच्या सरतील
हळूहळू जग अपणा सारें विसरुनियां जाईल

विसरतील जन खरेंच सगळे, सुधिरांचें परि काय ?
आठव होतां रडूं लागली हाय ! मोकलुनि धाय

अंतावेरी खरेंच मातें विसरतील ना मुळिंही
बघतिल माझी वाट सारखी बघुनि दिशांना दाही

भटकत असतिल चोंहिकडे का निहाळीत मजलागीं ?
गिळुनी बसले असतिल अश्रू अथवा बनुनि विरागी

छे ! धीराचे थोर पुरुष ते नसतिल ढळले चित्तीं
पापिणिला मज कोठुनि दिसणें आतां त्यांची मूर्ती ?

## : : ४२ : :

कोण हिंडतें खोलीमध्यें खिशांत घालुनि हात ?
कोण दिसे हें जागें अजुनी बघत उषेची वाट ?

भिरभिर कां हा चाले ? आजच झालें यातें काय ?
मध्येंच हंसतो, बरळत सुटतो आणिक रडतो हाय !

‘ हेंही गेलें, तेंही गेलें सर्व संपलें आज
ऊठ, संपलें चकोर ! तूझें या जन्माचें काज

सुधे, खरोखर मी नच असला –बुद्धी माझी चळली
चूक जाहली ! क्षमा पाहिजे तूं आतां मज केली

सूड उगविला दुर्दैवानें पुरा पातक्यावरतीं ?
कोण तुझ्याविण वांचवील जगिं असल्या पापापुढतीं ?

मना, कशावर आतां जगशिल ? काय तुला आधार ?
कसे साहशिल विवेक आंतुन करित असे जे वार ?

‘ गळा साधला नाहीं ! ’ धरिला गळाच माझा दैवें !
कोण अतां मज दुर्दैव्याला सांवरावया धावे ?

छे ! छे ! तुमचें अतां कशाला मला शिफारसपत्र ?
आग हवी तर लावा त्याला –नका पाठवूं चित्र !

हजार रुपये गेले, गेलें सुवर्णपद्कहि लोका,
हाय अरेरे ! दिला पुरा कीं नशिबानें या झोका

श्रद्धानंदजि ! माझ्यावरतीं नका रागवूं, चूक
झाली हातानें, मज घाला तुम्ही क्षमेची भीक ’

हेंही गेलें तेंही गेलें असें घोकण्या लागे
शांत अतांतर मुळीं न बसवे त्यातें एका जागे

मेजावरच्या व्हीनसचा तो खालीं फेंकी पुतळा
खोलीमध्यें तुकडा तुकडा त्याचा होउनि गेला

अंधारातें क्षण एक करी येउं न देई वारें
दुज्या क्षणीं दे दिवे लावुनी उघडी खिडक्या दारें

घेउनि रंगांच्या कलमांना मोडित केव्हां राही
तेलांच्या बाटल्या रिकाम्या कधीं करूनी देई

कागद् फाडित केव्हां बैसे, केव्हां कांहिं लिहीत
काय करील न करील याची मुळीं न उरली रीत

मन बावरलें सांवरूं नये फिरतो वणवण कोठें
‘ हेंही गेलें तेंही गेलें ’ सांगतसे लोकांतें

कुणी हांसती थट्टा करिती मिचकावूनी नयनां
मनःस्थिती कां याची ऐशी कळेल कुठुनी कोणां ?

कुणी बोलती हा तर होता चित्रकार हो नामी
कुणी सांगती दारूपायीं झाला हा कुचकामी

सलाम करितो कोणालाही व्याख्यानातें देई
लोक भोंवती जमती, हंसती, म्हणत ‘ वहावा भाई ! ’

पोरें ओढिति कोट तयाचा कुणी हांकलुनि देती
वेळ कुणाला सांवरण्याला भ्रमिष्ट याची वृत्ति

दिसतां पोलिस म्हणे तयांला, “ अपराधी मी असुनी
कां नच धरतां मला, मिरवतां नव डगले घालूनी ”
इंग्रजींत मग बोलूं लागे —म्हणे, “ भितां कां मजला !
प्रेमळ माझ्यापरि ना कोणी असे गव्हर्नर झाला ”
हो हो करिती, सांवरती त्या लावितात वाटेला
ओळखिती ते म्हणती झाला पुरता पागल झाला
काय कथावे वेड्याचे त्या भलभलते आचार
ताबा सुटला चित्तावरचा ! भडके वारें स्वैर !
कुठेंहि बैसे, कुठेंहि खाई, कुठेंहि कांहीं बोले
पश्चात्तापें चित्त तयाचें वेडें होउनि गेलें

## :: ४३ ::

सुधीर झाले पास मिळवुनी अपूर्व यश विषयांत
होतें आलें छापुनि वाची सुधा वृत्तपत्रांत
आनंदाच्या लहरी अंतरिं किती फुलोनी आल्या
हाय दुज्या क्षणिं परी लोपुनी अंतरांत त्या लपल्या
म्हणे जवळ मी असतें तर किति मोद तयांना होता
स्वतः तयांनीं निकाल अपला सांगितला मज असता
मीहि तयांना धावुनि असतें कवटाळूनी धरिलें
हाय अतां परि नशिबीं येणें कोठुनियां सुख असलें !
दुःख न कथण्या येई कोणां मोद दाविण्या बंदी
असा अभागी माझ्यापरि का असेल जगतीं बंदी ?

हृदय उडूनी जातें आहे सुधीरचरणांपाशीं
चित्तभृंग मम घाली रुंजी सुधीरपंकजपाशीं

लोपुनि जावें जन्मावें परि पांखरूं बनुनी स्तब्ध
खोलिंत जातां ऐकूं येतिल सुधीरमुखिंचे शब्द

लोपुनि जावें जन्मावें परि लेखनि जड होवोनी
करिं पडतां ये स्पर्श अनुभवूं केलेला हातांनीं

लोपुनि जावें जन्मावें परि मंद होउनी झुळुक
सुधीरकेशीं खेळायातें येइल मग निःशंक

वेडें मन हें तिचें असें हो प्रेमा भरती आली
करिते काय? कशी दैवानें गत होती झालेली!

म्हणे, पोटच्या जीवा! आतां तुझा नाश होणार
तूंही माझ्याबरोबरी चल, मीच तुझा आधार

कशास वांछिसि जगांत येण्या? सुख न ठेविलें येथें
तूंही माझ्याबरोबरी चल तूं तेथें मी जेथें

जगांत डोळे उघडलेस तर पांखर तुजला कोण
घालायातें राहिल? सगळे खातिल तुज टोंचून

दावितील कीं पापाचें हें प्रसादचिन्ह पहा हो
मनुजजातिचा होईल कसा अशा जिवांनीं लाहो?

प्रतीक माझ्या अविचाराचें कशास उरसी जगतीं
सागरतळिं चल आपण राहूं शिंप आणखी मोतीं

धीर न झाला जरी टाकण्या उडी मला जलधींत
होइल काय दशा मज न कळे असल्या क्रूर जगांत

खराच होइल धीर कराया साहस कसलेंही तें
मला क्षमेचें कवच मिळालें जर सुधिरांच्या हातें

कसें दाखवूं काळें मुख हें अविचारें मळलेलें ?
क्षमा कराया विनवूं कैसें झाले जर रागेले ?

सुधीर ऐकुनि तिरस्कार का खोटीचा करतील
आणि हांकुनी मज मूर्खेला बाहेरी देतील ?

केलें कांहीं जरी तयांनीं नच का मी अपराधी ?
हवींच शिक्षा भोगायातें कठिण असो वा साधी

क्षमेवांचुनी हृदय कसें हें पावन होइल माझें ?
क्षमेवांचुनी कलंकित कसें बुडवूं सलिलीं ओझें ?

मनीं ठरविते जाउनि सांगूं सुधीरांस इतिवृत्त
क्षमा मागुनी करूं जिवाचा कडेलोट उदकांत

मनीं येतसे देवींना का असें सोडणें योग्य ?
झालों आहों निःशंक म्हणे सगळ्यां आतां त्याज्य

तिरस्कार वाटला स्वतांचा ममता परि देवींची
डोळ्यांमधली धार थांबवूं शके न ती अश्रूंची

तिला न आतां परी सोसवे झाला अपरंपार
अविचाराचा उपकारांचा पापाचाही भार !

## :: ४४ ::

देवी गेल्या फिरावयातें पाहुनि करि ती घाई
आणि तयांच्या गीतेमध्यें पत्र ठेवुनी देई

'जात असें मी आलें जेथुनि, नका काळजी वाहूं
मातेपरि तुम्हिं रक्षियलें मज, कष्ट किती हे देऊं ?

आशीर्वादा द्या मज तुमच्या मानियल्या कन्येला
शपथ गळ्याची —नका विचारूं माझ्यास्तव कोणाला ’

शाल पांघरी थंडीला ना भिते एवढी कांहीं
लपवायातें लज्जा दुसरा उपाय दिसला नाहीं

तिला ठाउकें होतें स्टेशन दूर किती तेथून
म्हणून घेई अंधारांतुन पाय जरा उचलून

परी परिश्रम इतुके नव्हते कितीक दिन केलेले
त्यांत तियेचें शरीर होतें बरेंच भारवलेलें

तशीच ढकलित येत नवाला स्टेशनांत अंधारीं
सोक्षमोक्ष अजि करावयाची होती चित्तिं तयारी

म्हणे, अतां मी जातें परि ना ओळखुं दे मज कोणी
मला कुणाशीं वदावयाचें ना सुधिरांवांचोनी

कोळणि बसल्या होत्या त्यांतच आपण जाउनि बसली
म्हणे अशानें पांढरपेशी दुसरि न येइल जवळी

तिचिया वदनावरतीं होती अनुपम कांती चढली
एक एक हळु कोळिण तेथुनि दूर जराशी झाली

टकमक बघती पुन्हां तिजकडे कुणी मोडती बोटें
‘ दृष्ट न लागो ’ वदत मुलीला, लक्ष्मी त्यांना वाटे

मना म्हणे ती घट्ट अतां हो, उरलें थोडें जगणें
उद्यांपासुनी कसलि काळजी नाहीं तुजला करणें

जीव थरथरे म्हणे भेटतिल सुधीर ना हे आज ?
नातरि लोकांमाजी उरेल कोठें अपुली लाज ?

खिडकींतुनि बाहेर बघूनी अश्रू घेई टिपुनी
लागत होतें वदना वारें थंडथंड भिरभिरुनी

खिडकींतूनी बघे हळू ती स्टेशन कुठलें ये तें
धडधड होती हृदयीं चालत दुजें न ऐकूं येतें

मना सांवरी शाल आवरी ग्रांटरोडही आलें
म्हणे उतरणें येत्या स्टेशनिं वदन लपवुनी अपुलें

लटपट कांपति हातपाय नी अंगा सुटला घाम
कष्टें उतरे गाडी जाई बांकीं घे विश्राम

समोरच्या या फलाटावरी कोण उभा हा ताठ ?
ओळखिलें हिज यानें वाटे, काय पाहतो धीट ?

डोक्यावरतुनि नीट शाल घे थंडी होती फार
चालायाचा यत्न करूनी गांठित होती दार

सुटाबुटांतिल कोण बब्रर्जी दुज्या फलाटावरुन
चालतसे निरखून एवढा चिरूट तोंडीं धरुन ?

विकट हांसतो टाळी देतो म्हणे तीच ही खास
झिंगुनि गेला तरिही चाले टेकुनियां काठीस

हांका मारी, " सुधे ! सुधे ! मी ओळखतों का कोण ? "
थरथर कांपूं सुधा लागली नुसते वच ऐकून

दिसलें भूत तिला दुष्टाचें धीर परी ती करुन
तिकिटातें देऊन झटदिशीं जाय तिथून निघून

काठी टेंकित धावे परि त्या शरीर नावरताहे
" अहो भेटवा " म्हणे " मज तिची क्षमा मागणें आहे "

पळतां आदळला, रुधिराची शिरीं लागली धार
बघावया जन जमा जाहले अपघाता त्या घोर !

:: ४५ ::

धीर धरोनी पाउल उचली जरी पावतें कंप
मागें वळुनी मुळीं न पाही जरी लागली धांप

‘ नशिबाचा परि काय गुण ’ वदे ‘ इथेंहि का तो दुष्ट
ओळखण्यातें यावा पुढतीं पापिणिला या नष्ट ? ’

दूर जरासें गेल्यावरतीं मागें बघे वळून
येत कुणी का पाही पाळत अपुल्यावरि ठेवून ?

अकरा वाजुनि गेले होते थंडी होती फार
अंधारामधिं कोण एवढें कामाविण बाहेर

जिन्यावरूनी चौपाटीवर हळू हळू ती आली
तिला ठाउकी दिसे कुठोनी सुधिरांची ती खोली

खोलीमाजी उजेड दिसतां हृदय धडधडे तीचें
म्हणे मला का खरेंच होइल दर्शन अजि सुधिरांचें ?

पंख मला जर असते नच का गेलें असतें उडुन
सुधीरवदनांबुज बघण्यातें माझे डोळे भरुन ?

पोर उताविळ कुतूहलानें जैसें दुडुदुडु चढत
चित्त होउनी अधीर तेसें खोलीपाशीं पळत

गतसौख्याचा आठव परि हो नयनांमधिं ये पाणी
म्हणे आज मी जातें कैशी पापें जड होऊनी

वसंत फुलल्यापरी वाटला मागें मी जातांना
शिशिर ऋतू परि अतां कोळपी माझ्या हृदयसुमांना

उषा उदेली मला वाटलें मागें मी चढतांना
जीवितयात्रेची ही संध्या अतां वाटते स्वमना

अनंत किरणांचा शिरिं गमला किरीट झळके तेव्हां
अंधाराचीं असंख्य पटलें मना दडपिती एव्हां

गेलें —आणिक रागानें जरि दार तयांनीं बंद
केलें तर तुज गमेल कैसें ? फुटेल का हृद्बंध ?

मिळेल दर्शन पावन तनुही होइल त्यांस बघून
बघतां बघतां हृदय फुटूं दे, सुंदर असलें मरण !

असें म्हणोनी पाउल वळवी अपुलें मंदपणानें
थकून गेली चालुनि आणिक विचारही करण्यानें

म्हणे मनाला, धीर अतां कर, उरले थोडे कष्ट
अतां संपलें कार्य आपुलें होऊं आपण नष्ट

वाचुनि पाढा अविचाराचा क्षमा माग तूं सारी
अतां एवढ्या प्रसंगांत या दावी तुझी हुषारी

येत जिन्याशीं, म्हणे चढूं का, का परतूं येथून ?
कशास वाचा फोडा पापा ? देऊं अंत करून

क्षालन होइल कसें क्षमेविण पापाचें झालेल्या
चला चढूं या, पायऱ्याहि या पायांपाशीं आल्या

कष्टें चढते पायरिपायरि पायीं गोळे येती
ऊर धडधडे, भोंवळ केव्हां येई नयनांवरतीं

बसे परि उठे, चढवे तिज ना चवथा माळा आला
दुर्दैवा ! हा मध्येंच का रे घालणार तूं घाला ?

एकवटूनी शक्ती साऱ्या पुन्हां चढाया लागे
हृदयाची ती धडधड होती वाढत कितितरि वेगें

परिचित तिजला दारहि दिसलें वरतीं पाटी होती
कुलुपानें परि आशेची क्षणिं केली माती माती

पाय गळाल्यापरी होउनी बसली दारीं खालीं
म्हणते दर्शन सुलभ कोठुनी पापिजनांच्या भालीं ?

नयनांतूनी धारा खळखळ तिचिया वाहूं लागे
म्हणे मना, चल उतरूं येथुनि अतां मात्र रे वेगें !

:: ४६ ::

सुधा परतुनी उतरूं लागे धार लागली डोळां
उतरुनि खालीं आली होती नुकता एकच माळा

सुधीर होता वरतिं येत तों विचारांत गुंतून
स्तिमित होउनी जात पाहुनी सुधा उतरतां वरुन

म्हणे, "कोण ? तूं सुधा ?— परत कां माघाऱ्या हो फिरलां ?
चला जाउं या वरी, दिसतसां फार थकूनी गेलां"

बहुवचनानें गालिं आंसवें ओघळुनीयां आलीं
आली होती ध्यानीं तीची स्थिती विवश झालेली

मनांत म्हणतो हिचा दुज्याशीं योग दिसे झालेला
म्हणेल चित्तीं काय हिला जर कर आधारा दिधला

दुःखीं कसलें बंधन म्हणतो, हलके उठवी तीतें
म्हणे, " सुधा तूं वरतीं चल हळु आंवर बघुं अश्रूंतें "

सावकाश तिज वरतीं नेई, दार उघडुनी घेई
आंत बैसवी आरामासनिं बोलूं न तिला देई

पलंग अपुला साफसूफ करि मऊ वसन घालून
म्हणे, " अतां चल इथें पडूनी राहिं बोलल्यावीण "

हुंदहुंदके देउनि रडते तिला न होई धीर
ऐकायाचा —बोलायाचा किती जाहला फेर!

खुर्चीजवळी बसे म्हणे तिज, “ सुधे जरा विश्रांती
हवी तुला, तूं पडून राहीं स्वस्थ पलंगावरतीं ”

बोलूं पाहे एक शब्द ती शब्द न तिज फुटताहे
अश्रु आणखी हुंदहुंदके यांहिं न बोलवताहे

म्हणे, “ नको तूं बोलूं, आधीं तापवितों मी पाणी
दमलिस दिससी हातपाय नी वदन नीट घे धुवुनी ”

तीहि न बोले, सांगे तैसें करी, गप्पही राही
नयनींची परि धार न होती कमी जाहली कांहीं

दूध तापवुनि पावाचेही तुकडे भाजुनि दिधले
“ घेइं सुधे हे म्हणजे जातिल कष्ट तुला झालेले ”

अळेंबळें ती घेई आणिक अंथरुणाशीं जाई
सुचे न तीतें बोलायाचें अधोवदन ती राही

दूरदूर तो सुधीर वागे मंगळसूत्र बघून
सलगीनें तरि कसें वदावें त्यानें तें पाहून ?

बोलुं लागतां वदे सुधेला, “ अतां नीज तूं स्वस्थ
उशीर झाला आहे, आधिंच असती कष्टें त्रस्त

तूं नाहीं ना जात लौकरी ? मीहि न कोठें जातों
शांत झोंप घे, मींही येथें स्वस्थ निजून रहातों ”

निपचित पडुनी राही डोळे मिटुनी गादीवरतीं
सुधिरा गमलें बरें, म्हणे ही जिवंत आहे जगतीं!

हुडकित होतों किती ठिकाणीं विचारीत लोकांना
कुणीं पाहिली सुधा कुठें का कामातें करतांना

होता आपण धीर सोडला, कुठें अतां दिसणार ?
तों नशिबानें हिला दाविली दुःखानें बेजार

सावकाश तिज उद्यां विचारूं त्रास कशाचे होती
घरचीं नाहीं वागवीत तिज म्हणुनी काय रडे ती ?

का वेडीला वचन मोडलें म्हणुनी वाइट वाटे !
खुळी खुळी, हा देश कसा हें अजुनी माहित कोठें !

विचारावली चाले ऐशी सुधिराच्या चित्तांत
झोंप लागली दिसे सुधेला म्हणुनि उठे निमिषांत

अपुली काढी नरम शाल नी अंगावरतीं घाली
म्हणे बोलुं या स्वस्थपणानें तिजशीं प्रातःकाळीं

स्वस्थ झोंपला बुकांस घेउनि अपुल्या डोईखालीं
सुधेस न सुचे काय करावें विचित्र तसल्या कालीं

## :: ४७ ::

भीति वाटली सुधामनाला सकाळही होईल
आणि आपुला निश्चय कैसा तडीस मग जाईल

म्हणुनि उठोनी मंद पाउलीं गादीपाशीं जाई
चरण करांनीं धरी तत्क्षणीं तोही जागा होई

उठुनि बसे चटदिशीं सोडवी धरिले हातीं चरण
होतें अश्रूंनीं भिजलेलें सुंदर तीचें वदन

म्हणे, " सुधे ! का तुला वाटतें अवघड चित्तीं कांहीं
—तुझें लग्न का होउनि गेलें दुजियासंगें बाई ?

वचनमुक्त मीं केलें आहे ! सुखें करी संसार !
अजून अपुली मायभूमि ही स्वतंत्र नाहीं फार

कुणी आग्रही असातिल त्यांनीं भीड घातली तुजला
संसार तुझा दुजियासंगें असेल जुळवुन दिधला

बरें जाहलें !" ऐकुनि ती तर पुन्हां रडे अनिवार !
म्हणे, " तुला का नीट वागवित नाहीं तुझा भ्रतार ?"

वदे, " अतां मी सर्व सांगतें माझ्या अविचारास
आणि घेतला आहे कैसा गळयास लावुन फांस "

अथपासोनी इतिवेरीही सर्व कथियलें तीनें
म्हणे, " क्षमेस्तव आहे केलें तुमच्या दारीं येणें

उद्यां जगामधिं तोंड न आतां मजला दावायाचें
ठरवीलें आहे मीं सागरिं विलीनही होण्याचें

दर्शन घडुनी पुनीत झालें तुमचे धरुनी चरण
म्हणा क्षमा मज केली म्हणजे इथुनि लपवितें वदन

उद्यां जगामधिं सुधा तुम्हांला दिसणार कुठें नाहीं
आणि सुधेला सुधीर—" पुढतीं बोलुं न शकली कांहीं

सुधिराला तें ऐकुनि सारें पोटामधिं कालवलें
म्हणे सुधेचें मन दुःखानें किती होय हें खचलें

ओढुनि घेई पोटाशीं तिज, पाठीवरतुनि हात
फिरवुनि तिजला बोलूं लागे तोही गद्गद होत

म्हणे, " सुधे तूं सोडणार जग ? कशास मी मग राहूं ?
आणि तुझा हा आठव काढित दुःख कशाला साहूं ?

अविचाराच्या फळा भिण्याचें कारण काय असें तें
मी जर तुजला माझी म्हणण्या जिवंत आहें येथें

जाऊं दिधलें चित्रमंदिरीं मीही थोडा दोषी
हवी मलाही शिक्षा थोडी यास्तव भोगायासी

पश्चात्तापें पवित्र झालें आहेना मन तूझें ?
पापाचें मग उरलें आहे कोठें सांगें ओझें ?

जीव पोटिं तव, काय तयाचा दोष येथ वद आहे ?
हक्क तयाचा अवतरण्याचा जगिं या नच का राहे ?

चकोरही ना दुष्ट एवढा –मोह कुणा नच होई ?
कोणावर ना प्रसंग असला यावा मनिं हें घेई

जीवन शिकण्याची जीवांची जीवित आहे शाळा
कमी कुणा ना कुणिं लेखावें जर कां कोणी चुकला

भीरुपणानें दो जीवांचा नाश उगा कां करिसी ?
जीवितांत जें शिकलिस कांहीं शिकवीं तें जगतासी ! ”

गळ्यांत घालुनि गळा रडे ती स्फुंदस्फुंदुनि फार
सुधीर गोंजारुनि घेई तिज थोपटुनी हळुवार

वृत्तपत्र टाकिलें प्रभातीं पोरानें तों आंत
वाचति केविं चकोराचा त्या अपघातें हो अंत

:: ४८ ::

विपन्नाश्रमासमोर आहे सान कुणाचें घर हें ?
ही ‘ प्राध्यापक सुधीर ’ म्हणुनी पाटी तर दिसताहे

खेळ चालला आहे कसला ? उभे दूर लव राहूं
आणि खेळती कोणकोण हें चला तर खरें पाहूं

चेंडू टाकित कोण चिमुकली ? प्रतिमा दिसे सुधेची !
दो वर्षांचा कोण खेळतो ? मूर्ती आनंदाची !

यष्टिरक्षणासाठीं का हा सुधीर मागें आहे ?
सुधाच का ही चेंडु झेलण्या अंतरावरी राहे ?

पायऱ्यांवरी कोण दिसत ह्या खेळ बघाया आल्या ?
ह्या तर देवी, बाळ खेळतां वाजवितातो टाळ्या !

*